# काव्ये आणि विज्ञाने

Science and Poetry

विज्ञान आणि काव्य (१९२६, १९३५)

ह्या पुस्तकाचे भाष्यासहित पुनर्मुद्रण

लेखक

आय. ए. रिचर्ड्स्, कम्पॅनियन ऑफ ऑनर

भाषांतर

रा. भि. जोशी



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई-३२

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रात त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास, कला इत्यादी विषयात मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृती मंडळाने वाङमय निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा शब्दकोश, मराठी वाङमयकोश, विज्ञानमाला, भाषांतर-माला, आंतरभारती-विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा देण्याकरिता मराठीत विज्ञान आणि तंत्रविज्ञान, तत्त्वज्ञान व सामाजिक-शास्त्रे या विषयांवरील संशोधनात्मक व अद्यावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङमय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात, तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही. संशोधनाला परावलंबित्व राहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही, एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञान-विज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहातात.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटिन इत्यादी पश्चिमी भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतर किंवा सारांश अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा मंडळाच्या वाङमयीन कार्यक्रमातील भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून, ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्य व भारतीय भाषांतील सुमारे ३०० पुस्तके निवडली आहेत. होमर, व्हर्जिल, एस्किलस, ॲरिस्टॉफनीझ, युरिपिडीझ, प्लेटो, अरिस्टॉटल, टॉमस ॲक्वाइनस्, न्यूटन, डार्विन, रूसो, काण्ट, हेगल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपिअर, टॉल्स्टॉय, दोस्तयेव्स्की, कॅसिरेर, गॉर्डन व्ही. चाईल्ड इत्यादिकांचा या भाषांतर-मालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण, भरताचे नाट्यशास्त्र, संगीत रत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथासप्तशती, त्रिपीटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. भाषांतर योजनेखाली मंडळाने आतापर्यंत ३८ अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिलचे "On Liberty", रूसोचे "Social Contract", एम्. एन. रॉयचे "Reason, Romanticism and Revolution" व "Letters from Jail", स्तानिस्लाव्स्कीची "An Actor Prepares" व "Building a Character", तुर्गेनिव्हचे "Fathers and Sons", रायशेनबाखचे "Rise of Scientific Philosophy", गुन्नार मिरदालचे "Economic Theory and Underdeveloped Regions" भारतरत्न कै. पां. वा. काणे यांचे "History of Dharmashastra", कोपलँडचे "Music and Imagination", बर्ट्रण्ड रसेलचे "Religion And Science", तेरझागीचे "Theoretical Soil Mechanics", विशाखदत्ताचे "मुद्राराक्षसम्", भरतमुनींचे "भरत-नाटयशास्त्र" (अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९), निकोलाय मानुचीचे "Storia Do Mogor", ऑं. से. पिगु लिखित "Socialism vs. Capitalism", इझाडोरा डंकनचे "My Life", स्ट्राविन्स्कीचे "Poetics of Music" इत्यादी पुस्तकांची भाषांतरे व सारानुवाद प्रकाशित झाले आहेत.

६. प्रस्तुत आय. ए. रिचर्ड्स् लिखित "Poetries and Sciences" या पुस्तकाचा अनुवाद प्रा. रा. भि. जोशी, मुंबई, यांनी केला असून तो मंडळाच्या भाषांतरमालेत "काव्ये आणि विज्ञाने" या शीर्षकाने प्रकाशित करून मराठी वाचकांना सादर करण्यास मंडळास आनंद होत आहे. रिचर्ड्स्च्या साहित्य-समीक्षाविषयक कार्याचा आणि त्याच्या काही महत्त्वाच्या पुस्तकांचा परिचय शेवटी पुरवणीत करून दिला आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

वाई :
आश्विन १०, शके १९०१
विजयादशमी,
१ ऑक्टोबर १९७९.

# अनुक्रमणिका

# निवेदन

आय. ए. रिचर्ड्स्च्या 'सायन्स ॲण्ड पोएट्री' ह्या पुस्तकाचे मी भाषांतर करावे अशी सूचना मुंबईच्या ईस्थेटिक सोसायटीने मला केली आणि मी ती स्वीकारली. ह्या पुस्तकाची पहिली आवृत्ती १९२६ साली प्रसिद्ध झाली. त्यानंतर १९३५ साली त्याची सुधारून वाढवलेली दुसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली. पहिल्या आणि दुसऱ्या आवृत्तीतल्या मजकुरात बऱ्याच ठिकाणी आणि बराच फरक होता. १९३५ ची दुसरी आवृत्तीही दुर्मिळच झाली होती. पण ती आवृत्ती मिळवून मी तिच्यावरून भाषांतर करण्याला सुरुवात केली. पुढे मला असे वाटले की, पुस्तक महत्त्वाचे आहे तेव्हा त्याची आपली स्वत:ची एक प्रत आपल्याजवळ असावी. म्हणून मग मी स्वत:साठी पुस्तक मिळवण्याचा प्रयत्न केला. त्यात बरेच दिवस गेले आणि अखेर पुस्तक इंग्लंडहून मागवावे लागले. इंग्लंडहून पुस्तक आले ती १९७० ची म्हणजे ह्या पुस्तकाची अगदी अलीकडली आवृत्ती आहे. प्रस्तुत भाषांतरासाठी वापरलेली आवृत्ती ही १९७० ची आवृत्ती आहे. ह्या आवृत्तीच्या

वेळी लेखकाने १९३५ च्या आवृत्तीतला मजकूर जसाच्या तसा पुनर्मुद्रित केला, पण पुस्तकाचे 'सायन्स अँण्ड पोएट्री' हे मूळ नाव बदलले आणि 'पोएट्रीज अँण्ड सायन्सिज' असे नाव त्याला दिले. ह्या आवृत्तीत १९३५ च्या आवृत्तीपेक्षा सुमारे ४० पृष्ठे अधिक मजकूर आहे. हा जास्तीचा मजकूर टिपणे (Notes), फेरविचार (Reorientation), त्यातच विशेषीकृत अवतरण-चिन्हे (Specialized Quotation Marks) आणि 'आपण समाप्त झालो हे कवितेला कसे कळते?' (How Does a Poem Know When It Is Finished?) अशा नवीन भागांचा पुरवणीवजा आहे.

ह्या पुरवण्यांपैकी Notes मध्ये १९३५ च्या आवृत्तीत वापरलेल्या काही शब्दांसंबंधी, त्यांच्या युक्तायुक्ततेसंबंधीच साधक-बाधक चर्चा आहे. आणि बहुतेक टिपणांत चर्चेच्या ओघात रिचर्ड्स्ने स्वतःच्या इतर पुस्तकांचा आणि इतरांच्या पुस्तकांचा उल्लेख केला आहे. मूळ पुस्तकात वापरलेल्या इंग्रजी शब्दांसंबंधी ही टिपणे मुख्यतः असल्यामुळे त्यांच्या भाषांतराचा मराठी वाचकांना काही बोध किंवा उपयोग होणार नाही म्हणून Notes चे भाषांतर केले नाही.

Reorientation मध्ये लेखकाने १९३५ च्या आवृत्तीत केलेल्या काही विधानांचा फेरविचार केला आहे. क्वचित विस्तार केला आहे. क्वचित त्यात सुधारणा सुचवली आहे. हा भाग महत्त्वाचा असल्यामुळे त्याचे भाषांतर केले आहे. त्यातच Specialized Quotation Marks मध्ये त्याने अवतरणांची वेगवेगळी उद्दिष्टे सांगून त्यांचा वेगळेपणा दाखवण्यासाठी रोमन लिपीतली अक्षरे, प्रश्नचिन्हे, उद्गारचिन्हे इत्यादी अवतरणचिन्हे म्हणून वापरली आहेत आणि वापरण्याची सूचना केली आहे. ही चर्चा बहुतेक इंग्रजी वाक्प्रयोगावर आधारलेली असल्यामुळे तिचेही भाषांतर मराठी वाचकांना उपयोगी ठरणार नाही असे वाटल्याने त्या भागाचेही भाषांतर केले नाही.

How Does a Poem Know When It Is Finished? ह्या लेखातली चर्चा फारच महत्त्वाची आहे. तिचे संपूर्ण भाषांतर केले आहे. ह्या आवृत्तीसाठी रिचर्ड्स्ने नवी प्रस्तावना लिहिली आहे तिचेही भाषांतर केले आहे.

म्हणजे Notes आणि Specialized Quotation Marks वगळून बाकीच्या सर्व मजकुराचे हे भाषांतर आहे.

भाषांतर करताना जेव्हा मला असे वाटले की मुळातला शब्द किंवा शब्दसमूह भाषांतराबरोबर राहू दिला तर वाचकाला अर्थ समजण्याला साहाय्य होईल तेव्हा मी तो पहिल्यांदा आल्यावेळी भाषांतरापुढे गोल कंसात दिला आहे. नंतर दिला नाही.

अर्थबोधासाठी माझ्या पदरचा शब्द किंवा शब्दसमूह घालणे इष्ट होईल असे जिथे वाटले तिथे मी तो चौकोनी कंसात घातला आहे. मुळातच जो मजकूर गोल कंसात आहे तो भाषांतर करून गोल कंसातच दिला आहे.

प्रत्येक प्रकरणाच्या आरंभी रिचर्ड्स्ने काही काव्यपंक्ती अवतरणे म्हणून दिल्या आहेत. दुसऱ्या प्रकरणात वर्ड्ज्वर्थचे 'अपॉन द वेस्ट्मिन्स्टर ब्रिज' हे संपूर्ण सुनीत दिले आहे. नवीन घातलेल्या मजकुरात 'हाऊ डज अ पोएम नो?' ह्या लेखात विल्यम् एम्प्सन्ची 'लीगल फिक्शन' आणि रिचर्ड्स्ची स्वतःची 'वाय द पूल' ह्या दोन कविता सबंध दिल्या आहेत. वर उल्लेखिलेल्या काव्यपंक्ती आणि कविता ह्यांचे भाषांतर केले नाही. अवतरण म्हणून घेतलेल्या प्रकरणारंभीच्या काव्यपंक्तींच्या भाषांतराचा प्रकरणातले विवेचन समजण्याला प्रत्यक्ष उपयोग नाही. शिवाय काही ओळींचे भाषांतर अर्थहीन वाटण्याचा संभव आहे. ज्या सबंध कविता पुस्तकात दिल्या आहेत त्यासंबंधीचे लेखकाचे विवेचन त्यात वापरलेल्या शब्दांवरच आधारलेले आणि त्यासंबंधी असल्यामुळे भाषांतर करण्यात स्वारस्य नाही. उलट तसे केल्याने विवेचनाचे स्वारस्य जाईल, म्हणून त्यांचे भाषांतर केले नाही.

पुस्तकातील इतर उतारे, पद्यपंक्ती ह्यांचे भाषांतर केले आहे. ते आधी देऊन नंतर आवश्यक तेथे गोल कंसात मूळ अवतरण दिले आहे. कवितांचे मथळे, पुस्तकांची नावे वगैरे बहुतेक मराठी लिपीत दिली आहेत. पण मराठी लिपीत दिल्यामुळे अर्थबोध न होण्याची किंवा संदेह निर्माण होण्याची शक्यता वाटली तिथे मूळ इंग्रजी लिपीच ठेवली आहे.

शेवटी "पुरवणी" ह्या प्रकरणात रिचर्ड्स्च्या साहित्य समीक्षा-विषयक विचारांची स्थूल रूपरेषा दिली आहे. ती मुख्यत: *The Foundations of Aesthetics*, *The Meaning of Meaning*,

*Principles of Literary Criticism* आणि *Talencius on the Mind* हया त्याच्या ग्रंथांवर आधारलेली आहे. पुरवणीतले शब्द विषयसूचीत घेतले नाहीत.

आधी १९३५ ची आणि नंतर १९७० ची ह्या दोन्ही आवृत्त्या मला उपलब्ध करून देण्याच्या बाबतीत मुंबई येथील सिद्धार्थ कॉलेज ऑफ आर्ट्स् अँण्ड सायन्सिजचे ग्रंथपाल माझे जुने मित्र श्री. शां. शं. रेगे ह्यांनी त्यांच्या नेहमीच्या तत्परतेने आणि आस्थेने साहाय्य केले. त्यांच्या साहाय्याच्या अभावी १९७० ची आवृत्ती मला कदाचित मिळालीही नसती. मी त्यांचा ह्याबद्दल फार आभारी आहे. रिचर्ड्स्‌ची काही दुर्मिळ पुस्तके प्रा. मिलिंद मालशे ह्यांनी मला मिळवून दिली त्याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे.

भाषांतर पुरे झाल्यावर मी ते डॉ. रा. भा. पाटणकर, प्रा. श्री. पु. भागवत आणि प्रा. मिलिंद मालशे ह्यांना वाचून दाखवले. त्यावेळी त्यांच्याशी झालेल्या चर्चेचा आणि त्यांनी केलेल्या सूचनांचा मला फार उपयोग झाला. डॉ. पाटणकर आणि प्रा. भागवत ह्यांनी मला विषयसूची तयार करतानाही बहुमोल साहाय्य केले. इतर अनेक निकडीची कामे असतानाही त्यांनी माझ्यासाठी आपला वेळ दिला ह्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. डॉ. अशोक रानडे, डॉ. स. गं. मालशे, प्रा. गो. वि. करंदीकर आणि प्रा. मे. पुं. रेगे ह्यांच्याशी केलेल्या विचारविनिमयाचाही मला लाभ झाला आहे. त्यांचाही मी आभारी आहे. एकूण भाषांतराच्या बरे-वाईटपणाची जबाबदारी अर्थातच माझी आहे.

हे काम माझ्यावर सोपवल्याबद्दल ईस्थेटिक सोसायटीचा मी आभारी आहे.

१६-११-७४. **रा. भि. जोशी.**

# प्रस्तावना

हे छोटेसे पुस्तक माझ्याकडून अनेक प्रकारांनी हाताळले गेले आहे. का ते नक्की सांगता येत नाही, पण प्रसिद्ध झाल्यानंतर लवकरच मला त्याच्याबद्दल नावड उत्पन्न झाली. मला असे दिसून आले की, त्यातले जे मुद्दे सगळ्यात चांगले आणि अत्यंत स्पष्टपणे मांडले गेले आहेत असे मला वाटत होते त्यांचा लोकांनी अशा रीतीने अर्थ लावला की समर्थन करता येणार नाही इतके ते निरर्थक वाटू लागले. ते तसेच ठरावेत अशी विरोधकांची–ह्यात काही मातबर लोक होते–इच्छा असावी असे मला मग वाटू लागले. उदाहरणार्थ, कितीही काळजीपूर्वक स्पष्टीकरणे केली तरी व्याज-विधान (pseudo-statement) म्हणजे खोटे विधान (false statement) असेच मानण्याचा ते हेका धरीत. शब्दकोशांचा आधार घेऊन, छद्मपाद (pseudo-pods) आणि छद्मफल (pseudo-carps) ह्यांची उदाहरणे देऊन, त्यांच्यामधला भेद स्पष्ट करण्याचा मी कितीही प्रयत्न केला तरी व्यर्थ. ते आपल्या मनातल्या गोंधळाला चिकटूनच राहात. मी जे प्रतिपादन

करीत होतो त्याला ते दुजोराच देत होते हे माझ्या लक्षात यायला हवे होते. ते मला उत्तर देत होते ते व्याज-विधाने करून : "अंगीकृत कार्याच्या संदर्भात ज्या शब्दप्रयोगाचा वैज्ञानिक खरे-खोटेपणा अप्रस्तुत असतो असे शब्दप्रयोग" करून. खरे म्हणजे मी चिडायच्या ऐवजी आश्वस्त व्हायला पाहिजे होते.

ते काही असले तरी १९३५ साली थोडेसे थातुर-मातुर करून मी ह्या पुस्तकाची सुधारून वाढवलेली दुसरी आवृत्ती काढली. हे थातुर-मातुर म्हणजे काही ठिकाणी मुळातली शब्दयोजना बदलली, ज्यातून आताच एक उतारा घेतला ते व्याज-विधानासंबंधीचे टिपण लिहिले ; आणि 'निसर्ग' आणि 'श्रद्धा' ह्या शब्दांसंबंधी एक छोटेसे परिशिष्ट जोडले. ही दुसरी आवृत्तीच इथे पुनर्मुद्रित केली आहे. त्यानंतर लवकरच माझ्या लक्षात आले की मी जी स्पष्टीकरणे म्हणून केली त्यांचा काही परिणाम झाला नाही. ज्यांना उद्देशून ती केली होती त्यांचे लक्ष दुसरी-कडेच होते. त्याचेही कारण काही अंशी असे होते की, जिकडे लक्ष द्यायला मी त्यांना भाग पाडू शकेन अशी मला आशा वाटत होती तिकडे त्यांनी लक्ष दिले असते तर त्यांच्या नित्याच्या सवयीच्या विचारांना चांगलाच मोठा धक्का बसला असता. तरी काही वेळ मी प्रयत्न करीतच राहिलो. उदाहरणार्थ, आणखी एका आवृत्तीसाठी म्हणून १९४० किंवा १९४१ मध्ये, मी एक प्रस्तावना लिहिली. तिचा आरंभीचा भाग पुढे दिला आहे. आता (१९७०) अधिक स्वीकार्य वाटेल अशी शब्दयोजना मूळ शब्दयोजनेच्या पुढे कंसात दिली आहे.

> ह्या छोट्याशा पुस्तकाने त्याच्या ह्यापूर्वीच्या स्वरूपात ज्या प्रश्नाचा विचार करण्याचा प्रयत्न केला – आणि जो सोडवण्याचा असेही म्हणण्याचे धाडस करतो – तो म्हणजे "विज्ञान आणि काव्य ह्यांचे संकल्पन आपण कसे करावे ?" (How should we conceive Science and Poetry ? ) हा होता. "ती काय आहेत ?" (What are they ?) हा नव्हता. तसा प्रश्न मूर्खपणाचा आहे. "आपणाला त्यांचे संकल्पन कसे करता येईल ?" (How may we conceive them ?) ह्या प्रश्नाचे ते [ म्हणजे 'ती काय आहेत ?' What are they ? ] संक्षिप्त रूप

आहे असे आपण मानले तर मात्र गोष्ट वेगळी. विज्ञान आणि काव्य हे आपण त्यांचे चित्र काढावे किंवा वर्णन करावे म्हणून वाट पाहत बसलेले वस्तुगत पदार्थ नव्हेत. विज्ञान ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या वेगवेगळया गोष्टी (किंवा क्रिया) आहेत. तसेच काव्य ह्या नावाच्याही वेगवेगळया गोष्टी आहेत ह्यात शंका नाही. पण आपल्या ह्या चर्चेच्या दृष्टीने पाहता विज्ञान आणि काव्य म्हणजे केवळ "ज्यांना सामान्यपणे तसे म्हणतात त्या गोष्टी" नव्हेत. आपण जर यादी करायला बसलो (किंवा करायच्या प्रयत्नाला लागलो) तर विज्ञान ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या गोष्टींची एक सरमिसळ मोट होईल आणि काव्य नावाच्या वस्तूंची अधिकच सरमिसळ मोट होईल. ते श्रेष्ठ कोशरचनाकार्य मनोवेधक (अतिशय उपयुक्त) होईल. पण तो इतिहास होईल. ह्या गोष्टींना लोकांनी ही नावे कशी दिली (कोणत्या गोष्टींना लोकांनी ही नावे दिली) ह्याचा तो अहवाल होईल. पण आपले कार्य ह्यांपैकी काही गोष्टींचे संकल्पन आपण कसे करावे हे ठरवणे (विचारणे) आणि आपणाला शक्य झाले तर, आपल्या निर्णयांची (निवडींची) नोंद करणे (कारणे देणे) हे आहे. मग त्यांचे तसेच संकल्पन करण्यासाठी इतरांचे मन वळवण्याचा आपल्याला प्रयत्न करता येईल.

ह्या कामात [उपयोगी पडतील अशी] कोणतीही निश्चित सर्वमान्य अशी प्रस्थानस्थळे नाहीत, आणि निश्चित असे निर्णयही नाहीत. आपण कुठून प्रस्थान ठेवीत आहो आणि कुठे चाललो आहो हे अधिक चांगल्या प्रकारे पाहता यावे ह्यासाठी आपण विचार करीत असतो. आणखी असे की, एका विशेष अर्थाने ही चर्चा तिच्या स्वतःसंबंधीच होणे आवश्यक आहे. कारण माझ्या पुस्तकाच्या नावामध्ये मानवी वाग्व्यवहाराची ( Discourse ) विज्ञान आणि काव्य अशी जी विभागणी केली (केली असे मानता येईल) तशी विभागणी जर आपण केली (करणार असलो) तर "ह्या दोहोंपैकी मी इथे कशाबद्दल बोलत आहे?" असा प्रश्न आपण विचारला पाहिजे ( हे कदाचित मी पुरेशा स्पष्टपणे

केले नसेल). मी काय करीत आहे आणि काव्यात्म किंवा वैज्ञानिक (किंवा संमिश्र) अशी कोणत्या प्रकारची उत्तरे देण्याचा मी प्रयत्न करीत आहे हे मला इथे विज्ञानाविषयी आणि काव्याविषयी ज्या प्रकारचे प्रश्न उपस्थित केले गेले आहेत त्या प्रकारचे प्रश्न विचारून, शक्य तर सांगायचे आहे. आणि ही उत्तरे – गद्य पद्धतीने सांगितली असली तरी–काव्यात्मक असायला पाहिजेत हे आरंभीच सांगून टाकलेले बरे, कारण ही बाब वस्तुस्थितीची नसून निवड करण्याची आहे.

मूळ 'विज्ञान आणि काव्य' हे पुस्तक म्हणजे जसा 'प्रिन्सिपल्स ऑफ लिटररी क्रिटिसिझम्' ला फुटलेला एक फाटा होता, तसा हा प्रयत्न आणि १९३५ ची आवृत्ती ही 'प्रॅक्टिकल क्रिटिसिझम्' आणि 'इंटरप्रिटेशन इन टीचिंग' ह्यांची अपत्ये आहेत असे आता माझ्या सहजपणे लक्षात येत आहे. तसेच मी हा प्रयत्न पुढे का रेटला नाही तेही कळू शकत आहे. त्याऐवजी मी ते पुस्तक आवृत्ती संपलेल्या अवस्थेतच राहू दिले. त्यातले काही सुटे भाग वेच्यांच्या संग्रहात किंवा संक्षिप्त स्वरूपात बऱ्याच वेळा प्रसिद्ध झाले. तेवढे वगळले तर गेल्या पावशतकाहून अधिक काळ ते जवळ जवळ अनुपलब्धच आहे.

ते उकरून काढून त्याचे पुनःसंस्करण आता कशासाठी करायचे? हा प्रश्न त्यातली निम्म्याहून अधिक वाक्ये मला विचारीत आहेत. त्यांना तिहेरी उत्तर आहे: (१) त्यातल्या मूलभूत प्रश्नांसंबंधीचे निरपवाद तत्त्व कोणी अधिक शहाणी माणसे प्रतिपादतील तोपर्यंत वाट पाहावी लागेल असे दिसते. पण, दरम्यानच्या काळात, हे प्रश्न महत्त्वाचे आहेत आणि सध्याच्या विवेचनपद्धतीच्या साहाय्याने त्यांच्यासंबंधी रास्त भूमिका घेणे कठीण का जाते हे आपल्याला ज्यामुळे कळू शकेल अशी चर्चा त्यावर होणे इष्ट आहे. (२) भाषा आणि तिचे व्यवहार ह्यांचा विचार आपण कोणत्या पद्धतीने करावा ह्यासंबंधी दीर्घकाळ चालू राहणारी आणि आत्मचिकित्सक अशी आस्था आपण बाळगली तर तिच्यातून कोणत्या प्रकारचे बदल निष्पन्न होतील ह्याची शक्य तितक्या मोकळेपणाने नोंद करणे काही अंशी तरी महत्त्वाचे ठरण्याची शक्यता आहे. (३) एका डोळ्यापेक्षा दोन डोळ्यांनी अधिक चांगले दिसते आणि

एका कानापेक्षा दोन कानांनी अधिक चांगले ऐकू येते. शिवाय श्रवण आणि दर्शन ही सतत एकमेकांच्या चुका सुधारीत असतात. अधिक अमूर्त विषयातला जो लक्षात येण्यासारखा भाग आहे त्याची वेगवेगळचा अंगांनी तुलना आणि जुळणी केल्यामुळे आपल्याला अशीच संधी मिळू शकेल. उलटपक्षी आपल्याला परिचित असे दृष्टिविषय कसे दिसतात ह्यात बदल झाला तर दृष्टिकोणात काय बदल झाला असेल ह्यासंबंधी तर्क करण्याचा प्रयत्न करणे उद्बोधक होऊ शकेल.

माझ्या पुस्तकाच्या नावात सुधारणा करून अशा एका बदलाला उठाव देण्याचा प्रयत्न मी केला आहे. पुस्तकाची नावे जितक्या प्रश्नांची उत्तरे देतात त्यापेक्षा अधिक प्रश्न ती उपस्थित करतात, आणि कधी त्यांची उत्तरे देतातही. 'विज्ञान आणि काव्य' ह्या मूळ नावाने – कदाचित मॅथ्यू आर्नल्डचा अनुकार करून – ह्या दोहोंमध्ये एक प्रकारचा विरोध उभा केला होता. काहींना तो जवळजवळ एक संघर्ष वाटला असेल ; निदानपक्षी त्यात विभक्तपणा तर होताच. ईश्वरशास्त्राच्या ( theology ) राजकारणाचा तो एक भाग असावा असा ध्वनी निघण्याला त्यात वाव होता.

नवीन नाव 'काव्ये आणि विज्ञाने' असे आहे. त्याने दोन गोष्टी दूर राखल्या गेल्या आहेत : (१) काव्य आणि विशिष्ट विज्ञाने (Poetry and the Sciences) आणि (२) विशिष्ट काव्ये आणि विशिष्ट विज्ञाने (The Poetries and the Sciences). ह्या दोन गोष्टी नाकारल्यामुळे त्यात काही अंशी अधिक विनम्रता आणण्याचा प्रयत्न झाला आहे. पहिल्यातून असा अर्थ सूचित झाला असता की एक प्रवर्तक तत्त्व ( originative essence ) किंवा सर्जनशील क्रिया आणि तिचा अनेक ज्ञानशाखांशी असलेला संबंध ह्याविषयी त्यात चर्चा आहे. दुसऱ्याचा अर्थ असा झाला असता की दोन मोठचा वंशांचे ( genera ) सर्वेक्षण आणि त्यांच्या जातींचे ( species ) व्यवस्थापन करण्याची त्यात सूचना आहे. ह्या पुस्तकाच्या उद्दिष्ट कार्यापेक्षा ते कार्य अनंत पटींनी मोठे आहे. ह्या नव्या नावात जी अनेकवचने वापरली आहेत त्यामुळे एक म्हणजे त्या प्रकारांकडे ( genres ) पुन्हा लक्ष जाईल आणि दुसरे म्हणजे

गणिती, सांख्यिकी आणि अनुभवनिष्ठ (empirical) विवेचन पद्धतीत जे परस्पर फरक आणि विरोध आहेत त्यांच्याकडे लक्ष जाईल. दोहोंमधल्या ह्याच सीमारेषांवर काही संघर्ष, ढवळाढवळ आणि गोंधळ सध्या निर्माण होताना दिसत आहे. आधारसामग्रीवर संस्करण करण्यात जसजशी प्रगती होत जाईल तसतसे हे संघर्ष वगैरे वाढत जातील. अनेकवचनांचा उपयोग केल्यामुळे अपरिपक्व अंतिम तत्त्वे शोधण्याला, त्याचप्रमाणे व्याख्यांच्या साहाय्याने अपरिपक्व उत्तरे शोधण्यालाही आळा बसेल. आता ज्याचे पुन्हा नव्याने परीक्षण केले जात आहे त्या निबंधात हे दोन्ही प्रमाद घडले असल्याचे आढळेल. तेव्हा आपण 'काव्य' आणि 'विज्ञान' बाजूला ठेवावे आणि त्याऐवजी 'काव्यांच्या' आणि 'विज्ञानांच्या' सोयिस्कर, आणि आपल्या आटोक्यात येतील अशा वाटणाऱ्या, अशा जितक्या वेगवेगळ्या संकल्पनांचा उपयोग करता येईल तितक्यांचा करावा हे बरे.

कनेक्टिकट संस्थानातील मिड्ल्टाउन येथील वेझ्लियन् विद्यापीठाच्या सेण्टर फॉर ॲड्व्हान्स्ड स्टडीजची माझ्यावर जी ऋणे आहेत त्यांपैकी १९६६-६७ च्या हिवाळ्यामध्ये ह्या निबंधाचे पुन्हा परीक्षण करून त्यासंबंधी काय करावे ह्याचा विचार करण्यासाठी जी फुरसत मिळाली ते एक मोठे ऋण आहे. ह्या निबंधात सुधारणा करण्याचे प्रयत्न अव्याहत चालू राहू शकतील हे उघड आहे. मी आता थांबतो आहे ह्याचे कारण एवढेच की दुसरी कामे मध्ये आली आहेत.

१९७०. **आय्. ए. आर.**




# विज्ञान आणि काव्य

(१९२६, १९३५)

काव्याचे भवितव्य अपरिमेय आहे. ह्याचे कारण असे की, जे काव्य आपल्या थोर नियतकार्याला अनुरूप असते त्यात, जसजसा काळ जाईल तसतसा, माणसाला अधिकाधिक पक्का आधार लाभत जाईल. असा कोणताही धर्म नाही की जो हादरला नाही; असे कोणतेही अधिकृत धर्ममत नाही की जे शंकास्पद असल्याचे दाखवून दिले गेले नाही; अशी कोणतीही स्वीकृत परंपरा नाही की जी विसर्जित होण्याची धास्ती नाही. आपला धर्म घटिताश्रयी झाला आहे. आणि हे घटितही तथाकथितच. आपली भावना त्याने घटिताशी निगडित केली आहे. आणि आता हे घटितच त्याला दगा देत आहे. पण काव्याचे मात्र कल्पना ( Idea ) हेच सर्वस्व आहे.

मॅथ्यू आर्नल्ड.

*( The future of poetry is immense, because in poetry, where it is worthy of its high destinies, our race, as time goes on, will find an ever surer and surer stay. There is not a creed which is not shaken, not an accredited dogma which is not shown to be questionable, not a received tradition which does not threaten to dissolve. Our religion has materialized itself in the fact, in the supposed fact ; it has attached its emotion to the fact, and now the fact is failing it. But for poetry the idea is everything.—)*

MATHEW ARNOLD.

# ९. सामान्य परिस्थिती

In the hour of the Blue Bird and the Bristol
Bomber, his thoughts are appropriate to the
years of the Penny Farthing.

W. H. AUDEN, *The Dog Beneath the Skin.*

माणसाचे आज दिसणारे भवितव्य इतके आशादायक नाही की, ते सुधारण्याच्या कोणत्याही साधनांची त्याने उपेक्षा करावी. अलीकडल्या काळात त्याने आपल्या चालीरीतीत आणि राहाणीत बरेच बदल केले आहेत. ते काही अंशी बुद्धिपुरस्सर झाले आहेत आणि काही अंशी योगायोगाने. ह्या बदलातूनच आणखी काही असे व्यापक बदल घडून येऊ पाहात आहेत की, त्यामुळे नजीकच्या भविष्य काळात आपले खाजगी आणि सामाजिक जीवन जवळजवळ पूर्णपणे बदलून जाण्याची शक्यता दिसत आहे. माणसाची परिस्थिती जशी बदलत चालली आहे तसा माणूस स्वतःच बदलत आहे. पूर्वीच्या काळीही त्याच्यात बदल झाला हे खरे आहे. पण कदाचित तो केव्हाही इतक्या झपाट्याने झाला नसावा. ह्यापूर्वीच्या काळात त्याची परिस्थिती इतक्या झपाट्याने आणि इतक्या प्रमाणात बदलल्याचा, तसेच त्या बदलांबरोबर मानसिक, त्याचप्रमाणे आर्थिक, सामाजिक आणि राजकीय धोके निर्माण झाल्याचाही पुरावा नाही. बदलातला हा झपाटाच भीतिप्रद आहे. माणसाच्या

प्रकृतिस्वभावाचे काही भाग असे आहेत की ते इतरांच्या मानाने बदलाला अधिक प्रतिकार करतात. आपल्या काही सवयी-चालीरीती बदलत असताना त्यांच्याबरोबरच इतर ज्या सवयी-चालीरीती बदलणे आवश्यक आहे त्या जर बदलल्या नाहीत तर ते आपल्याला घातक ठरण्याची शक्यता आहे.

ज्या सवयी हजारो वर्षे टिकून राहिलेल्या आहेत त्या टाकून देणे सोपे नसते. त्यातल्या त्यात विचार करण्याच्या ज्या सवयी असतात, ज्यांचा बदलत्या परिस्थितीशी प्रत्यक्ष संघर्ष होत नाही, किंवा ज्यांमुळे आपली दिसून येण्यासारखी काही हानी किंवा गैरसोय होत नाही अशा सवयी टाकून देणे सोपे नसते. तरी पण आपल्याला नकळत आपली फार मोठी हानी होण्याची शक्यता आहे. दगडाच्या पडण्याच्या प्रकारांसंबंधी आपली जी स्वाभाविक विचारपद्धती होती ती किती गैरसोयीची होती ह्याची आपल्याला १५९० पूर्वी काहीच कल्पना नव्हती. पण दगड पडतो म्हणजे नेमके काय होते हे गॅलिलीओने शोधून काढले तेव्हापासूनच आधुनिक युग सुरू झाले. स्वच्छतेसंबंधीच्या आपल्या परंपरागत कल्पना अडाणीपणाच्या आहेत हे ज्यांना १८०० पूर्वी माहीत होते त्यांना लोक वेडपट समजत असत. ह्या कल्पनांचे उच्चाटन लिस्टरने केले तेव्हापासून जन्माला आलेले मूल किती वर्षे जगेल त्याबद्दलची अपेक्षा तीस वर्षांनी वाढली आहे. मलेरिया हा विशेष जातीच्या डासामुळे होतो हे सर रॉनल्ड रॉस ह्यांनी शोधून काढले. तोपर्यंत समजूत अशीच होती की मलेरिया प्रतिकूल ग्रहदशा आणि वाईट हवा ह्यांच्यामुळे होतो. ह्या समजुतीच्या परिणामांची कोणालाच कल्पना नव्हती. इ. स. १०० पूर्वी जर मलेरियाच्या कारणाचा शोध लागला असता तर कदाचित रोमन साम्राज्य आज तारखेला-सुद्धा भरभराटीत राहिले असते.

अशी उदाहरणे समोर असताना आपल्या वाडवडिलांनी स्वतःच्या बाबतीत जे योग्य मानले ते यापुढे आपण आपल्या बाबतीत किंवा आपल्या मुलांच्या बाबतीत योग्य मानावे—जीवनाच्या कोणत्याही व्यवहारात—हे सहजासहजी पत्करण्यासारखे नाही. म्हणून मग अपरिहार्यपणे असे वाटू लागते की, वरवर पाहता फारसे महत्त्व नसलेल्या—उदाहरणार्थ,

काव्यासारख्या – विषयाबाबतच्या आपल्या परंपरागत कल्पनांमुळे आपण कदाचित त्याच्या गाभ्यापासून दूर राहत असू. बहुतेक विषयांसंबंधीच्या आपल्या ज्या विचार करण्याच्या सवयी आहेत त्या आजदेखील बव्हंशी पाच हजार वर्षांपूर्वीसारख्याच आहेत ह्याची जाणीव झाली म्हणजे थोडीशी भीतीच वाटते आणि ही जाणीव होणे अटळ आहे. ह्या नियमाला विज्ञाने ही केवळ अपवाद आहेत. विज्ञानाचे क्षेत्र सोडले – आणि आपला विचार अजूनही पुष्कळसा विज्ञानाच्या क्षेत्राच्या बाहेरच चाललेला असतो – तर आजदेखील आपण शंभर किंवा दोनशे पिढ्यांपूर्वी आपले पूर्वज करीत होते त्याच पद्धतीने विचार करतो. काव्यासंबंधी जी शिष्टसंमत मते आहेत त्या बाबतीत तरी ही वस्तुस्थिती निश्चित आहे. इतर विषयांबाबतच्या पुरातन काळातल्या कल्पना जशा चुकीच्या ठरल्या आहेत, तशा याही विषयाबाबतच्या चुकीच्या असू शकणार नाहीत का? ज्या कल्पना कशाला लागू पडत नाहीत आणि कधी लागू पडल्याही नाहीत अशा कल्पना निर्जीवपणे स्वीकारून पुढल्या पिढ्यांना देत गेल्यामुळे, म्हणजे आपल्या मूर्खपणामुळेच, आपले आजचे आयुष्य म्हणजे संकटांची एक संतत परंपराच असल्यासारखे पुढल्या पिढ्यांना वाटणे शक्य नाही काय ?

सर्वसाधारण सुशिक्षित माणूस आता अधिकाधिक सुबुद्ध (conscious) होत चालला आहे. हा अतिशय अर्थगर्भ बदल आहे. ह्याचे कारण कदाचित असे असेल की, त्याचे जीवन अधिक गुंतागुंतीचे होत चालले आहे, अधिक बव्हंगी होत चालले आहे, त्याच्या आकांक्षा आणि गरजा बहुविध होत चालल्या आहेत आणि त्यात संघर्ष निर्माण होण्याची शक्यता वाढत आहे, आणि जसजसा तो अधिक सुबुद्ध होत जाईल तसतसे परंपरागत सवयीला आंधळेपणाने मान तुकवून प्रवाहाबरोबर वाहत जाण्यात त्याला समाधान वाटणार नाही. विचार करणे त्याला भाग पडेल आणि ह्या त्याच्या विचार करण्याला जर वांझोटया चिंतेचे स्वरूप आले तर त्यात अनपेक्षित असे काही नाही. कारण त्याच्या पुढले प्रश्नच तशी विलक्षण अडचण निर्माण करणारे आहेत. डॉ. जॉन्सनच्या काळातल्यापेक्षा आज विवेकपूर्वक जगणे अधिक कठीण झाले आहे आणि त्याच्याही काळात ते तसे कठीणच होते हे बॉझ्वेलने जे सांगितले आहे त्यावरून दिसते.

विवेकपूर्वक जगणे ह्याचा अर्थ केवळ तर्कबुद्धीच्या आधाराने जगणे असा नाही. तशी गैरसमजूत होणे साहजिक आहे आणि एका विशिष्ट मर्यादेपलीकडे तशी समजूत होणे घातक ठरेल. विवेकपूर्वक जगणे ह्याचा अर्थ विवेकबुद्धीला – सबंध परिस्थितीच्या पूर्ण स्वच्छ आकलनाला – पटेल अशा रीतीने जगणे. आणि सबंध परिस्थितीचा सगळ्यात महत्त्वाचा भाग म्हणजे – नेहमीप्रमाणेच – आपण स्वतः, आपण ज्या पर्यावरणात राहतो त्याला प्रतिसाद देणारा आपला प्रकृतिस्वभाव. भौतिक सृष्टीचे आपल्याला जो जो अधिक ज्ञान होते, – उदाहरणार्थ, आपल्या शरीरासंबंधीच – तो तो आपल्याला असे दिसून येते की, आपले नेहमीचे वागणे अधिकाधिक बाबतीत वस्तुस्थितीशी विसंगत, गैरलागू, अपव्ययरूप, गैरफायद्याचे, धोक्याचे आणि मूर्खपणाचे आहे. भाज्या उकडण्याच्या बाबतीतलीच आपली सवय घ्या. योग्य प्रकारे आहार कसा करावा हे सुद्धा आपल्याला शिकायला हवे आहे. त्याचप्रमाणे मनाविषयी जी काही थोडीबहुत माहिती आपल्याला झाली आहे तिच्यावरून असे दिसून येते की, ज्या गोष्टींशी आपला संबंध येतो त्यांपैकी अनेकांच्या बाबतीतली आपली विचार करण्याची आणि भावना अनुभवण्याची पद्धती वस्तुस्थितीला सोडून असते. काव्यासंबंधीचे आपले जे विचार आणि ज्या भावना आहेत त्यांच्या बाबतीत ही गोष्ट विशेषच जाणवते. जे गट (orders) वेगळे ठेवायला पाहिजेत ते एकमेकांत मिसळून आणि त्यांची गल्लत करून आपण विचार करीत आणि बोलत असतो. आपल्या आणि वस्तूंच्या अंगी ज्या शक्ती नाहीत त्यांचा आपण आपल्यावर आणि वस्तूंवर आरोप करतो आणि ज्या शक्ती आपल्या दृष्टीने अतिशय महत्त्वाच्या आहेत त्यांकडे आपण दुर्लक्ष तरी करतो किंवा त्यांचा चकीचा उपयोग करतो.

प्राचीन काळच्या विचार करण्याच्या सवयींनी माणसाला सृष्टीचे जे रूप सिद्ध करून दिले आहे त्या रूपाशी त्याला अलीकडे जुळवून घेता येईनासे झाले आहे. आपल्याला कोणीकडे जायचे आहे ते त्याला अजून ठाऊक नाही. ते त्याने अजून ठरवले नाही. त्याचा परिणाम असा झाला आहे की, त्याला जीवन अधिकाधिक गोंधळवून टाकणारे वाटत आहे. सुसंगतपणे जगणे अधिकाधिक कठीण वाटू लागले आहे. म्हणून तो आता

स्वत:संबंधी – स्वत:च्याच प्रकृतिस्वभावासंबंधी – विचार करू लागला आहे. जीवन विवेकपूर्वक जगण्यासाठी आधी मनुष्याच्या प्रकृति-स्वभावाचे अधिक सम्यक् ज्ञान होणे आवश्यक आहे.

वस्तुविज्ञानाच्या (physics) क्षेत्रात जितके कार्य झाले आहे त्याच्याशी दूरान्वयाने तुलना करता येईल इतके जरी कार्य मनोविज्ञानाच्या क्षेत्रात झाले, तरी एखादा इंजिनिअर साधू शकेल त्यापेक्षाही अधिक नजरेत भरेल अशी व्यवहारोपयोगी फलनिष्पत्ती त्यातून होऊ शकेल ही गोष्ट फार काळापूर्वी आपण ओळखली आहे. मनोविज्ञानाच्या क्षेत्रातली प्रगतीची पहिली पावले सावकाश पडली आहेत, पण जी प्रगती झाली आहे तिच्यामुळेसुद्धा माणसाचा समग्र दृष्टिकोण बदलण्याला सुरुवात झाली आहे.




## २. काव्यवाचनाचा अनुभव

O chestnut tree, great rooted blossomer,
Are you the leaf, the blossom or the bole ?
O body swayed to music, O brightening glance,
How can we know the dancer from the dance ?

W. B. YEATS, *The Tower*.

पुष्कळ वेळा काव्याच्या अंगी फार मोठे गुण चिकटवले जातात. ह्या पुस्तकाच्या आरंभी मॅथ्यू आर्नल्ड ह्यांचा जो उतारा दिला आहे ते ह्याचे एक उदाहरण आहे. काव्याच्या अंगी इतके मोठे गुण चिकटवलेले पाहून अनेकांना फार आश्चर्य वाटते, किंवा उत्साही माणसाच्या उत्साहाकडे पाहून सहिष्णुतेने थोडेसे स्मित करावे तसे लोक करतात. खरे म्हणजे काव्यासंबंधीचा अधिक प्रातिनिधिक असा सध्याचा दृष्टिकोण पाहिला तर तो काव्याचे भवितव्य 'शून्य' आहे असा दिसतो. पीकॉकने 'द फोर एजिस ऑफ पोएट्री' ह्या आपल्या ग्रंथात ह्यासंबंधी जे निष्कर्ष मांडले ते आज अधिक सर्वमान्य ठरतील. तो म्हणतो, "सध्याच्या काळात कवी म्हणजे सुसंस्कृत समाजात अर्धसंस्कृत मनुष्य असावा तसा होय. तो भूतकाळात वावरत असतो. कोणत्याही प्रमाणात काव्याची उपासना केली गेली तरी तितक्या प्रमाणात दुसऱ्या एखाद्या उपयुक्त ज्ञानशाखेची उपेक्षा केली जातेच. जिच्या ठिकाणी अधिक चांगले कार्य करण्याचे सामर्थ्य आहे अशी बुद्धी

काव्यनिर्मितीसारख्या ऐसपैस, आळसट आणि उद्देशहीन व्यापारात वाया चाललेली पाहिली म्हणजे दुःख होते. नागर समाजाच्या बाल्यावस्थेत त्याचे लक्ष वेधण्यासाठी मानसिक खुळखुळा म्हणून काव्याचा उपयोग झाला ; पण मन प्रौढ झाल्यानंतर त्याने लहानपणची खेळणी गंभीरपणे हाताळणे हे वयात आलेल्या माणसाने बोथी चोखण्यासारखे किंवा झोप यावी म्हणून अंगाई म्हणायला सांगण्यासारखे आहे. आणि अनेकांनी – त्यात कीट्स् देखील आहे – अधिक विषादपूर्वक असे म्हटले आहे की, विज्ञानाच्या प्रगतीचे अपरिहार्य पर्यवसान म्हणजे काव्यनिर्मितीची शक्यता नाहीशी होणे."

ह्यात खरे काय आहे? काव्यासंबंधीच्या आपल्या कल्पनांवर विज्ञानाचा काय परिणाम होणार आहे? प्रत्यक्ष काव्यावर काय परिणाम होणार आहे? पूर्वीच्या काळात काव्याला फार महत्त्व देण्यात आले होते ही एक वस्तुस्थिती आहे. हे महत्त्व रास्तपणे दिले गेले होते की नाही, किंवा काव्याला ह्यापुढे देखील असेच महत्त्व दिले जात राहील की नाही, ह्यासंबंधी आपले मत काहीही असले तरी पूर्वीच्या काळात काव्याला इतके महत्त्व का दिले गेले हे आपल्याला सांगता आले पाहिजे. त्याला इतके महत्त्व दिले गेले ह्यावरून हेच दिसते की, काव्याच्या ह्या समर्थनाच्या प्रकरणात फार महत्त्वाचे प्रश्न गुंतलेले आहेत. मग ते समर्थन रास्त असो की चुकीचे असो. महत्त्वाचे प्रश्न उपस्थित केल्यावाचून आपल्याला ह्या प्रकरणाचा योग्य परामर्श घेता येणार नाही.

मानवी व्यवहारात काव्याला इतके मोठे स्थान का मिळाले हे समजून सांगण्यात पुष्कळ श्रम खर्ची पडले आहेत. पण ज्यामुळे समाधान झाले आहे किंवा खात्री पटली आहे असे निष्कर्ष त्यांतून निघालेले नाहीत. ह्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. कारण काव्याला महत्त्व का हे दाखवण्यापूर्वी काव्य म्हणजे काय हे थोडेबहुत तरी पाहणे आवश्यक आहे. परवापरवापर्यंत हे काम पुरतेपणी करणे शक्य होत नसे. कारण सहजप्रवृत्ती आणि भावना ह्यासंबंधीच्या मानसशास्त्राची प्रगती अगदीच अत्यल्प झालेली होती. शिवाय विज्ञानपूर्व कालातली चिकित्सा स्थूल अशा गृहीत तत्त्वांच्या आधारावर स्वाभाविकपणेच होत असल्यामुळे

तोही एक अडथळा होता. व्यावसायिक मनोवैज्ञानिकाची काव्या-संबंधीची आस्था बहुधा फारशी उत्कट नसते, आणि साहित्यिकाला मनाच्या एकूण व्यवहाराची यथार्थ कल्पना नसते. त्यामुळे ह्या दोघांपैकी एकाच्याही ठिकाणी ह्या विषयाच्या चिकित्सेला अवाश्यक असलेली पात्रता नसते. ही चिकित्सा समाधानकारकपणे करण्यासाठी काव्याची भावनोत्कट समज आणि मनोव्यापारांचे भावनारहित वृत्तीने विश्लेषण करण्याचे सामर्थ्य ह्या दोहोंची आवश्यकता आहे.

अगदी स्थूल अर्थाने का होईना पण 'काव्य ही कोणत्या प्रकारची वस्तू आहे ?' ह्या प्रश्नानेच आपल्या चर्चेला आरंभ करणे उत्तम. ह्या प्रश्नाचे उत्तर आपण दिले म्हणजे मग पुढला प्रश्न आपल्याला विचारता येईल, 'काव्याचा उपयोग किंवा दुरुपयोग कशा प्रकारे होऊ शकेल ?' आणि त्यानंतरचा प्रश्न 'काव्य ही एक मूल्यवान वस्तू आहे असे कोणत्या कारणांमुळे मानता येईल ?'

आपण एक अनुभव उदाहरणादाखल घेऊ. एखाद्या माणसाच्या आयुष्यातल्या दहा मिनिटांचा कालावधी घेऊन त्याची स्थूल रूपरेषा काढू या. या अनुभवाची एकंदर संरचना कशी असते ते दाखवणे आता शक्य झाले आहे. त्यातला महत्त्वाचा भाग कोणता ते दाखवता येते, गौण आणि आनुषंगिक काय, त्याचे कोणते अंग कोणत्या अंगावर अवलंबून आहे, तो निर्माण कसा झाला आणि त्या माणसाच्या भविष्यकालीन अनुभवावर ह्या अनुभवाचा काय परिणाम होण्याचा संभव आहे हे सर्व सांगणे आता शक्य आहे. ह्या वर्णनात अर्थातच मोकळ्या अशा पुष्कळच मोठ्या जागा आहेत. तरी पण एखाद्या अनुभवाच्या प्रसंगी मन कसे कार्य करते, आणि अनुभव म्हणजे कशा प्रकारचा घटना-प्रवाह असतो, हे सामान्यपणे समजून घेणे आता अखेर शक्य होत आहे.

कविता – उदा. वर्ड्ज्वर्थचे 'वेस्ट्मिन्स्टर ब्रिज' हे सुनीत—हा एक असा अनुभव आहे. त्यातल्या पद्यपंक्ती वाचीत असताना योग्य प्रकारच्या (right kind) वाचकाला येणारा हा अनुभव आहे. मानवी व्यवहारात काव्याचे स्थान काय आणि त्याचे भवितव्य काय हे समजून घेण्यासाठी पहिली गोष्ट करावी लागेल ती ही की, अशा प्रकारच्या अनुभवाची एकंदर संरचना कशी असते ते पाहाणे. त्यासाठी आधी आपण ही कविता

अगदी सावकाश वाचू या. मोठ्याने वाचलेली अधिक बरी. आणि अशा बेताने की, प्रत्येक शब्दावयवाला (syllable) आपल्या मनावर पूर्ण परिणाम करण्याला वेळ मिळावा. आणि वाचनाचाही प्रयोग करू या. कवितेची लय जास्तीत जास्त प्रमाणात आपल्याला सापडली आहे अशी खात्री होईपर्यंत स्वर बदलून पुन्हा पुन्हा वाचून पाहू या. आपल्या वाचनामुळे दुसऱ्याला आनंद वाटला किंवा न वाटला तरी ही कविता 'अशीच' वाचली गेली पाहिजे अशी खात्री पटली म्हणजे पुरे.

Earth has not anything to show more fair :
Dull would he be of soul who could pass by
A sight so touching in its majesty:
This City now doth, like a garment, wear
The beauty of the morning: silent, bare,
Ships, towers, domes, theatres and temples lie
Open unto the fields, and to the sky,
All bright and glittering in the smokeless air.
Never did sun more beautifully steep
In his first splendour valley, rock or hill ;
Ne'er saw I, never felt, a calm so deep !
The river glideth at its own sweet will :
Dear God ! the very houses seem asleep ;
And all that mighty heart is lying still !

ह्या ओळी वाचल्यानंतर आपल्याला जो अनुभव येतो त्याचे विश्लेषण आपण–आलंकारिक भाषेत बोलायचे तर–पृष्ठभागापासून आत ह्या दिशेने करणे योग्य होईल. ह्या अनुभवाचा वरचा भाग म्हणजे कागदावर छापल्या गेलेल्या शब्दांचा डोळ्याच्या आतल्या पड्यावर (retina) उमटणारा ठसा. ह्या ठशामुळे एक प्रकारचा क्षोभ (agitation) निर्माण होतो. तो जसा आत आत जाऊ लागतो तसतसा त्याचा मागोवा आपल्याला घेतला पाहिजे.

ह्यातल्या पहिल्या घटना म्हणजे कवितेतल्या शब्दांचा आपल्या 'मनाच्या कानाला' ऐकू येणारा नाद आणि मनातल्या मनात उच्चारल्या गेलेल्या शब्दांचा 'स्पर्श' (ह्या गोष्टी जर घडल्या नाहीत तर बाकीचा अनुभव अगदी अपुरा राहील). ही दोन त्या शब्दांना जणू पूर्णपणे 'सदेह' करतात. शब्दांना प्राप्त झालेल्या ह्या 'पूर्ण देहां'च्या साहाय्याने कवी आपले कार्य करीत असतो. त्यांच्या मुद्रित चिन्हांच्या साहाय्याने नाही. ह्या 'पूर्ण देहां'तून शब्दांचा संपूर्ण अर्थ अभिव्यक्त होतो, तसा मुद्रित चिन्हांतून होत नाही. अनिवार्य आणि नियंत्रक असे हे अभिव्यक्तिकार्य विकसित करू न शकल्यामुळे अनेक लोकांना काव्यापासून जवळजवळ काहीच लाभत नाही.

त्यानंतरचा टप्पा म्हणजे मनश्चक्षूसमोर विविध चित्रे उभी राहातात. शब्दांची नाही, तर शब्द ज्या वस्तूंचे द्योतक असतात त्यांची. कदाचित जहाजांची, कदाचित टेकड्यांची. आणि त्याबरोबरच कदाचित इतर अनेक प्रकारच्या वस्तूंची. वेस्ट्मिन्स्टर पुलाच्या मुंढेरीवर रेलून उभे राहिले तर कसे वाटेल ह्याची चित्रे. कदाचित चमत्कारिक वाटेल. पण 'नीरवते' चे चित्रही उभे राहील. पण खुद्द शब्दांच्या बिंबदेहांचे ( image bodies ) जसे मूलभूत महत्त्व आहे तसे वस्तूंच्या मानस-चित्रांचे नाही. ज्यांना ती दिसतात त्यांना भले ती अनिवार्य वाटतील, आणि त्यांना ती आवश्यकही असतील, पण इतरांना त्यांची मुळीच जरुरी वाटणार नाही. हा मुद्दा असा आहे की, त्याबाबत वेगवेगळ्या व्यक्तींच्या मनामध्ये अतिशय स्पष्ट भेद दिसून येतात.

इथून पुढे ह्या अनुभवरूपी क्षोभप्रवाहाला दोन फाटे फुटतात. त्यांपैकी एक मोठा असतो आणि एक लहान. असे असले तरी ते अनेक ठिकाणी परस्परांना भेटत असतात आणि त्यांचा परस्परांवर निकट प्रभाव पडत असतो. खरे म्हणजे केवळ विवेचकाच्या हातचे एक साधन म्हणूनच आपल्याला त्यांना दोन प्रवाह म्हणता येईल.

ह्यांपैकी जो लहान प्रवाह असतो त्याला बौद्धिक प्रवाह म्हणता येईल. दुसऱ्याला कृतिप्रवण (active) किंवा भावनात्मक प्रवाह म्हणता येईल. हा आपल्या आस्था-व्यापारांचा बनलेला असतो.

बौद्धिक प्रवाहाचा मागोवा घेणे सोपे असते. किंबहुना ते आपोआपच घडते. पण हा प्रवाह दोहोंपैकी कमी महत्त्वाचा आहे. काव्यात तो केवळ साधनरूप आहे. कृतिप्रवण प्रवाहाला तो चेतना देतो आणि दिशा दाखवतो. हा प्रवाह विचारांचा बनलेला असतो. पण विचार म्हणजे सबोध (conscious) मनात केव्हा तरी प्रकट होऊन पुन्हा बुडी मारून खाली जाणाऱ्या स्थितिशील छोटचा वस्तू नव्हेत. त्या प्रवाही घटना होत. विचार ज्यांच्यासंबंधी असतो त्यांच्याकडे त्या अंगुलिनिर्देश करीत असतात.

विचारांचे काम असा अंगुलिनिर्देश करणे एवढेच आहे. ते आणखीही पुष्कळ काही करतात असे भासते. उदाहरणार्थ, प्रतिकृती करणे किंवा निर्मिती करणे. पण ते आपल्याला होणारे प्रमुख आभास आहेत. शुद्ध (pure) विचाराचे क्षेत्र हे स्वायत्त क्षेत्र नाही. आपले विचार हे आपल्या आस्थांचे बांधील असतात आणि जेव्हा ते बंड करताना दिसतात तेव्हा सुद्धा खरोखरच ते आपल्या आस्थांपैकी काहींचे बंड असते. आपले विचार वस्तूंकडे अंगुलिनिर्देश करतात. त्यांनी निर्दिष्ट केलेल्या वस्तूंशी व्यवहार करणे हे काम दुसऱ्या म्हणज कृतिप्रवण प्रवाहाचे आहे.

काव्य वाचणाऱ्यांपैकी काही लोकांचा (तेही ते बहुधा फारसे वाचीत नाहीतच) पिंड असा असतो की, विचारांचा हा बौद्धिक प्रवाह निर्माण होण्यापलीकडे त्यांच्या मनात दुसरे काही फारसे घडत नाही. खऱ्या कवितेला ते मुकतात असे म्हणण्याचीही आवश्यकता नाही. अनुभवाचे हे बौद्धिक अंग फुगवून दाखवणे, त्याला त्याच्यासाठीच अतिरिक्त महत्त्व देणे ही ह्या काळातली विशेष प्रवृत्ती आहे आणि पुष्कळसे लोक काव्य वाचीत नाहीत ह्याचे हेच कारण असावे.

खरे महत्त्व आहे ते अनुभवातल्या कृतिप्रवण प्रवाहाला. कारण सबंध क्षोभामधली सगळी शक्ती ह्या प्रवाहातून आलेली असते. मुख्य यंत्राकडून संचालित झालेला पण त्याचे नियंत्रण करणारा चतुर आणि अमोल असा हा एक 'नियंत्रक' (governor) असतो. त्याचे जे काम असते तसेच काहीसे मनात चाललेल्या विचारांचे असते. मूलतः प्रत्येक अनुभव म्हणजे एखादी जागृत होऊन पुन्हा विश्राम पावणारी एखादी आस्था किंवा आस्थापुंज असतो.

आस्था म्हणजे काय हे समजण्यासाठी आपण अशी कल्पना करू या की, मन म्हणजे अत्यंत नाजुकपणे संतुलित राहिलेल्या तुलायंत्रांचा एक व्यूह आहे. यावत्काल आपण निरोगी असतो तावत्काल हा व्यूह सतत वाढत असतो. आपल्यापुढे येणाऱ्या प्रत्येक प्रसंगी ह्यातली काही तुलायंत्रे काही अंशी विचलित होतात. ज्या मार्गांनी ती आपला समतोल परत साधतात ते मार्ग म्हणजे ज्या प्रेरणांच्या साहाय्याने आपण त्या प्रसंगाला प्रतिसाद देतो त्या प्रेरणा. ह्या व्यूहातली मुख्य तुलायंत्रे म्हणजे आपल्या मुख्य आस्था.

अशी कल्पना करा की, जिथे वरीच लोहचुंबक यंत्रे आहेत अशा ठिकाणी आपण एक होकायंत्र घेऊन गेलो आहो. आपण चालत असतो तोवर होकायंत्राची सुई थरथरत असते. आपण नव्या जागी जाऊन उभे राहिलो म्हणजे सुईदेखील एका नव्या जागी स्थिरावते. आता आपण अशी कल्पना करू या की, आपल्याजवळ एका होकायंत्राऐवजी बऱ्याच लहान-मोठ्या चुंबक सुयांचा एक व्यूह आहे आणि त्या आपण अशा रीतीने ठेवल्या आहेत की, त्या एकमेकींवर प्रभाव पाडतात. त्यातल्या काही उभ्याच डोलतात, काही आडव्या, तर काही मुक्तपणे. आपण चालू लागलो की, त्या व्यूहात जी चलबिचल होईल ती अत्यंत गुंतागुंतीची असेल. पण तो व्यूह आपण कसाही, कुठेही ठेवला तरी अखेर अशी एक विश्रांतावस्था येईलच की, त्या अवस्थेत त्या सगळ्या सुया स्थिरावलेल्या असतील. सगळ्या व्यूहालाच एक समतोल आलेला असेल. पण त्यातली व्यवस्था थोडीशी जरी बदलली तरी तो सगळा सूचिसमूह नवा समतोल साधण्यासाठी धडपडू लागेल.

आणखी एक गुंतागुंत. कल्पना करा की, ह्या व्यूहाची हालचाल त्याबाहेर असलेल्या काही लोहचुंबकांमुळे चाललेली आहे. आणि त्या व्यूहातल्या सुया एकमेकींवर प्रभाव पाडीत असतानाच त्यातल्या काही सुया मात्र बाहेरच्या लोहचुंबकांपैकी काहींनाच प्रतिसाद देत आहेत. ह्या निबंधाच्या वाचकाच्या कल्पनाशक्तीला जर एखाद्या दृश्य आधाराची आवश्यकता वाटत असेल तर त्याला एखादा नकाशा सहज काढता येईल.

मन हा एक असाच व्यूह आहे. मात्र कल्पनाही करता येणार नाही इतका गुंतागुंतीचा. सुया म्हणजे आपल्या आस्था. कमी अधिक महत्त्वाच्या. एखाद्या सुईत झालेली चलबिचल ज्या मानाने इतर सुयात चलबिचल घडवून आणील त्या मानाने तिचे महत्त्व. अवस्था बदलली किंवा नवीन प्रसंग उभा राहिला की नव्याने व्यूहामध्ये असमतोल निर्माण होतो. म्हणजे एक नवी गरज निर्माण होते. व्यूहाची पुनर्रचना होताना जी थरथर होते त्या आपल्या त्या प्रसंगीच्या प्रतिक्रिया. म्हणजे ज्यांच्या साहाय्याने आपण नवी गरज पुरी करतो ते स्पंद. पुष्कळदा असे होते की, चलबिचल झाल्यानंतर बराच काळपर्यंत नवा समतोल प्राप्त होत नाही. अशी ताणलेली स्थिती काही वेळा अनेक वर्षे राहू शकेल.

मूल जन्माला येते तेव्हा त्याचा मनोव्यूह तौलनिक दृष्टया साधा असतो. तौलनिक दृष्टीने पाहता त्याच्यावर फारच थोडया गोष्टींचा परिणाम होतो आणि त्याच्या प्रतिक्रिया देखील थोडया आणि साध्या असतात. पण तो झपाटयाने अधिक गुंतागुंतीचा होत जातो. त्याला पुन्हा पुन्हा अन्न लागते आणि नाना कारणांनी त्याच्याकडे लक्ष द्यावे लागते. त्यामुळे त्याच्या मनोव्यूहातल्या सगळया सुया सतत आंदोलत राहातात. हळूहळू विविध गरजांचे वर्गीकरण होते आणि उपव्यूह तयार होतात. भुकेमुळे एका जातीच्या प्रतिक्रिया निर्माण होतात. खेळणी पाहून दुसऱ्या एका प्रकारच्या. मोठया आवाजांमुळे आणखी तिसऱ्या प्रकारच्या, इ. इ. पण हे उपव्यूह कधीही परस्परांपासून पूर्णपणे अलग होत नाहीत. अशा रीतीने वाढता वाढता मुलावर अधिकाधिक आणि अधिक सूक्ष्म घटनांचा परिणाम होत जातो आणि ते वाढत जाते त्याबरोबरच त्याचे जगही वाढत जाते.

काही बाबतीत ते अधिक सूक्ष्मता दाखवू लागते. आजूबाजूच्या परिस्थितीत थोडासा फरक पडला तरी त्याचा समतोल जातो. इतर बाबतीत ते अधिक स्थिर राहते. ते वाढत असल्यामुळेच वेळोवेळी त्याच्या आस्थाविषयात भर पडत जाते. लैंगिक आस्था हे त्याचे ठळक उदाहरण आहे. त्याच्या गरजा वाढत असतात. अगदी नवीन कारणांमुळे ते विचलित होऊ शकते. परिस्थितीच्या अगदी नव्या पैलूच्या बाबतीत ते प्रतिसादक्षम बनते.

A-2020—3-B.

हा विकास अगदी अप्रत्यक्षपणे होत असतो. समाज त्याला टप्प्याटप्प्यावर वळण लावतो. त्याची पूर्ण वाढ होईपर्यंत दोन-तीन वेळा त्याची अर्धवट पुनर्घटना करतो. तसे जर झाले नसते तर त्याची वाढ आणखीच वेडीवाकडी झाली असती. माणूस प्रौढ दशेला पोचतो तेव्हा त्याच्यापाशी मुख्य आणि गौण अशा अनेक आस्थांचा साठा झालेला असतो. त्यातल्या काहींचा नुसताच ढिगारा असतो. काहींचा व्यूह झालेला असतो. त्याच्या व्यक्तित्त्वाचे काही भाग पूर्ण विकसित झालेले आणि प्राप्त प्रसंगाला प्रतिसाद देण्याला मोकळे असतात. बाकीचे, एकमेकात आपातत: अनेक प्रकारे गुंतलेले, एकमेकांची अडवणूक करीत असतात. हे जे आस्थांचे विलक्षण गुंतागुंतीचे जाळे असते त्याला कवितेला आवाहन करावयाचे असते. कधी ती कविताच आपल्या ठिकाणी क्षोभ निर्माण करते तर कधी कधी आधीपासूनच असलेले क्षोभ नाहीसे होण्यास कविता साधनभूत होते. बहुधा एकाच वेळी ह्या दोन्ही गोष्टी होत असतात.

म्हणजे आपल्याला असे म्हणावे लागेल की, काव्यवाचनानुभवाचा प्रवाह म्हणजे विचलित झालेल्या ह्या आस्थांचा परत समतोल साधणे. आपण आधी मुळी कविता वाचतो, ते आपल्याला त्याबद्दल आस्था असते म्हणून. आपली एखादी आस्था काव्याच्या वाचनाने प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे परत समतोल मिळवण्याचा प्रयत्न करीत असते म्हणून. आणि आपण कविता वाचताना जे काही घडत असते तेही ह्यासारख्या कारणांनी घडत असते. आपल्याला शब्दांचे अर्थ कळतात (अनुभव-प्रवाहाची बौद्धिक शाखा यशस्वीपणे वाहात असते) ह्याचे कारण त्यांद्वारा आपल्या आस्था प्रतिसाद देत असतात. आपण लावलेला कवितेचा अर्थ म्हणजे ह्या आस्थांमध्ये झालेले चलनवलन. अनुभवाचा वाकीचा सगळा भाग म्हणजे वरीलप्रमाणे किंवा अधिक स्पष्टपणे जुळते करून घेण्याची चाललेली आपली क्रिया.

अनुभवाचा दुसरा भाग भावना आणि वृत्ती (attitudes) ह्यांचा बनलेला असतो. भावना म्हणजे [एखाद्या प्रसंगाच्या अनुरोधाने] आपल्या ठिकाणी होणारी प्रतिक्रिया, आणि तिचा शारीरिक बदलात दिसणारा प्रतिसाद, ह्यासंबंधी आपल्याला होणारी जाणीव (What the reaction feels like). प्रतिसादाने सिद्ध केलेल्या, ह्या किंवा त्याप्रकारे वागण्याला प्रवृत्त करणाऱ्या, प्रेरणा म्हणजे

वृत्ती.[१] ह्या प्रेरणा म्हणजे प्रतिसादाचा बहिर्गामी भाग म्हणता येईल. कधीही उत्पन्न न होणाऱ्या प्रसंगासाठी तयार ठेवलेला संच एवढाच त्याचा अर्थ असू शकेल. त्याच्यापुढे त्या प्रेरणा कदाचित काही वेळा जाणारही नाहीत. उदाहरणार्थ 'वेस्ट्मिन्स्टर ब्रिज' ह्या कवितेच्या संदर्भात त्याकडे दुर्लक्ष होणेही सहज शक्य आहे. पण एक साधे उदाहरण घेऊ या. चर्चमध्ये किंवा एखाद्या गंभीर अशा भेटीच्या प्रसंगी हसण्याची उकळी येते, ती दडपून टाकणे अतिशय आवश्यक असते. आपण हसू फुटू देत नाही, पण हसण्याच्या प्रेरणा त्यांच्या मर्यादित स्वरूपात कार्यप्रवृत्त झाल्या होत्या ह्यात शंका नाही. कवितेमुळे ज्या अधिक सूक्ष्म आणि अधिक प्रकृष्ट (elaborate) प्रेरणा निर्माण होतात त्या तत्वत: ह्यापेक्षा वेगळ्या नसतात. सामान्यत: त्या दिसत नाहीत किंवा बाहेर पडत नाहीत ह्याचे कारण त्या अतिशय जटिल – गुंतागुंतीच्या – असतात. जेव्हा त्या एकमेकींशी जुळवून घेतात आणि सुसंगत अशा व्यूहरूपात संघटित होतात तेव्हा तत्संबद्ध गरजा पुऱ्या केल्या जातात. पूर्णपणे विकसित झालेल्या माणसाच्या बाबतीत जेव्हा कृती करण्याला पूर्णत: योग्य अशी परिस्थिती अस्तित्वात नसते तेव्हा कृतीसाठी सिद्धता असणे हेच कृती करण्याची जागा घेईल. काव्य आणि इतर सर्व कला ह्यांचे एक मूलभूत वैशिष्टच असे आहे की, त्यात [कृतीसाठी] पूर्णत: योग्य अशी परिस्थिती अस्तित्वात नसते. आपण रंगभूमीवर पाहतो तो नट हॅम्लेट नव्हे, म्हणून कृतीसाठी सिद्धता हेच कृतीच्या स्थानी असते.

अनुभवांचा मुख्य आराखडा हा असा आहे. आधी गरजांच्या संचांनी उचलून घेतलेले – आपल्या डोळ्यांच्या आतल्या पडद्यांवरचे – ठसे (ज्यांना कोणत्याही आस्था प्रतिसाद देत नाहीत असे आणखी किती इतर ठसे दिवसभर संपूर्णपणे दुर्लक्षित राहातात ह्याची आठवण करा). त्यानंतर एक प्रकृष्ट क्षोभ आणि पुनर्व्यवस्थापन. त्याचा एक प्रवाह शब्दांनी व्यक्त केलेल्या अर्थासंबंधीच्या विचारांचा असतो. दुसरा भावनात्मक प्रतिसादाचा असतो. त्यातून वृत्ती – म्हणजे कृतींसाठी

---

[१] वृत्तींसंबंधीच्या अधिक चर्चेसाठी प्रस्तुत लेखकाच्या *Principles of Literary Criticism* चे १५ वे प्रकरण पाहा. (Harcourt Brace and World, Inc. 1925, 1968).

सिद्धता-परिणत होतात. मग कृती घडोत वा न घडोत. ह्या दोन प्रवाहांचा एकमेकांशी निकट संबंध असतो.

पण ह्या वृत्तींना-त्यांना उचित म्हणून ओळखू येतील असे-प्रकट होण्याचे मार्ग जरी मिळाले नाहीत-आणि बहुधा ते मिळत नाहीत-तरी जगाशी होणाऱ्या आपल्या सर्व व्यवहारांवर त्यांचे सतत नियंत्रण नसते असा ह्याचा अर्थ नाही. त्यांचे नियंत्रण नसते असे जेव्हा मानले जाते तेव्हा 'कलेसाठी कला' आणि 'वांझोटा सौंदर्यवाद' पुढे येतात.

ह्या दोन प्रवाहांमधल्या परस्परसंबंधांचे आपण थोडे अधिक जवळून दर्शन घेऊ या. विचारांना आपण बाकीच्या प्रतिसादाचे नियंत्रक आणि कारक असे अधिक स्पष्टपणे मानीत नाही हे थोडेसे चमत्कारिक वाटेल. त्यांना तसे मानणे हीच खरोखर परंपरागत मानसशास्त्राची फार मोठी चूक आहे. माणसाला वानरापासून वेगळे काढणारी जी वैशिष्टये आहेत त्यांवर भर देणे माणसाला आवडते. आणि ह्या वैशिष्टयांपैकी मुख्य वैशिष्टये म्हणजे त्यांची बौद्धिक सामर्थ्ये. ही महत्त्वाची आहेत खरी, पण जिला ती पात्र नाहीत अशी प्रतिष्ठा त्याने त्यांना दिली आहे. बुद्धी ही आस्थांची जोडीदारीण ( adjunct ) आहे. तिच्या साहाय्याने त्या स्वतःला परिस्थितीशी अधिक यशस्वीपणे जुळवून घेतात आणि बुद्धी हे माणसाचे वैशिष्टच असले तरी माणूस म्हणजे मुख्यतः बुद्धी नव्हे; तो एक आस्था-व्यूह आहे. बुद्धी माणसाला साहाय्य करते; त्याला चालना देत नाही.

काही अंशी स्वाभाविक अशा ह्या चुकीमुळे आणि काही अंशी बुद्धीच्या व्यवहारांचा अभ्यास करणे अधिक सोपे असल्यामुळे मनोव्यापारांचे परंपरागत विश्लेषण 'खाली डोके वर पाय' असे झाले आहे. ह्या चुकीमुळे ज्या अडचणी निर्माण झाल्या आहेत त्यावर उपाय म्हणूनच बव्हंशी काव्याला भविष्यकाळी पुष्कळ महत्त्व राहण्याची शक्यता आहे. पण काव्य-वाचनाच्या अनुभवाकडे आपण पुन्हा एकदा अधिक चांगले निरखून पाहू या.

पहिला प्रश्न असा की, काव्याचे वाचन करताना शब्दांना त्यांचा संपूर्ण कल्पनाजनित नाद आणि देह देण्याची आवश्यकता काय? कवी आपले कार्य हा नाद आणि देह ह्यांच्या साहाय्याने करतो असे म्हणण्याचा अर्थ काय? ह्याचा अर्थ असा की शब्दांचे बुद्धीच्या द्वारा आकलन

होऊन त्यातून उदय पावलेल्या विचारांना रूप मिळून ते अनुसरले जाऊ लागण्यापूर्वीच शब्दांची गती आणि नाद ह्यांचा आस्थांवर खोल आणि निकट प्रभाव पडू लागलेला असतो. हे कसे घडते हे कळून घेण्याच्या प्रयत्नांना अजूनपर्यंत यश आलेले नाही. पण हे घडते ह्याविषयी मात्र संवेदनक्षम अशा कोणाही कवितावाचकाला शंका वाटत नाही. पुष्कळसे काव्य आणि काही श्रेष्ठ प्रतीचेही काव्य असे आहे की, त्यातल्या शब्दांचा अर्थ बहुतांशी कळून न घेतला किंवा दुर्लक्षिला गेला तरी काही नुकसान होत नाही. (उदाहरणार्थ, शेक्सपियरची काही गीते अशी आहेत. आणि एका वेगळ्या अर्थाने, स्विन्बर्नच्या उत्कृष्ट कवितेपैकी बरीचशी अशी आहे). अर्थात ही गोष्ट अजिबात प्रयत्न न करता साधण्यासारखी नाही. पण साधली तर काही वेळा तरी तिच्यामुळे फायदा होतो. पण शब्दांच्या 'अर्थाचे' आकलन होण्याचे सापेक्ष महत्त्व वेगवेगळे असणे शक्य आहे ही साधी गोष्ट लक्षात आली तरी तूर्त आपल्याला पुरे आहे. (ब्राउनिंगच्या 'बिफोअर' ह्या कवितेची 'आफ्टर' ह्या कवितेशी तुलना केली तर हे लक्षात येईल).

बहुतेक सर्व कवितेच्या बाबतीत शब्दांचा नाद आणि स्पर्श–ज्यांना 'आशया'च्या (content) विरोधी असे 'आकृती' (form) हे नाव मिळालेले आहे ते–'आशया'च्या अगोदरपासूनच कार्य करू लागलेले असतात आणि शब्दांचा जो अर्थ आपण नंतर लावतो त्यावर ह्या घटनेचा सूक्ष्म प्रभाव पडलेला असतो. बहुतेक शब्द–विशेषत: काव्यातले–त्यांच्या सरळ अर्थाच्या दृष्टीने पाहिले तर संदिग्ध असतात. आपण आपल्या मर्जीप्रमाणे त्यातून बरेच अर्थ काढू शकतो. आपण त्यातून जे अर्थ काढतो ते कोणते असतात ? तर ज्या प्रेरणा आधीच स्फुरून कवितेला आकृती देऊ लागलेल्या असतात त्यांना सर्वात साजेसे असतील ते. म्हणजे कवितेचा जो अर्थ आपल्याला अद्यापि कळलेला नसतो त्यांचे आकृती हे अनिर्वचनीय असे पूर्वसूचक असते. ही गोष्ट आपल्याला नेहमीच्या संभाषणात सुद्धा दिसून येते. बोलल्या गेलेल्या शब्दांचा निव्वळ तार्किक अर्थ आपण लक्षात घेत नाही, तर बोलणाऱ्याचा स्वर आणि बोलण्याचा प्रसंग ह्या मुख्य घटकांच्या आधारे आपण अर्थ लक्षात घेतो. विज्ञानाचा प्रयत्न हे घटक बाजूला काढण्याचा असतो आणि त्यात त्याला अधिकाधिक

यश मिळत आहे हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. वैज्ञानिकावर आपण विश्वास ठेवतो ते तो आपली विधाने सिद्ध करू शकतो म्हणून. तो ती वक्तृत्वपूर्ण किंवा आवेशपूर्ण पद्धतीने करतो म्हणून नव्हे. किंबहुना तो आपल्या निवेदनपद्धतीने छाप पाडीत आहे असे दिसले तर आपण त्याच्यावर विश्वास ठेवीत नाही.

शब्दांच्या योजनेच्या बाबतीत बहुतेक कवितेतील पद्धती विज्ञानाच्या अगदी उलट असते. कवितांत अगदी निश्चित असे विचार व्यक्त होतात, पण ते तर्कदृष्ट्या एक अर्थ सोडून बाकीचे सर्व बाजूला राहावेत अशारीतीने शब्दांची योजना झालेली असते म्हणून नव्हे. शब्द वापरण्याची पद्धती, त्यांच्या स्वरांची जात, त्यांचा चढउतार आणि लय ही आपल्या आस्थांवर प्रभाव पाडतात आणि त्या शब्दांतून जे अनेक विचार निघण्यासारखे असतात त्यांपैकी नेमके जे त्या आस्थांना हवे असतात ते निवडायला लावतात. म्हणूनच काव्यमय वर्णने ही गद्य वर्णनापेक्षा किती तरी अधिक नेमकी वाटतात. तार्किक पद्धतीने किंवा शास्त्रीय पद्धतीने वापरलेल्या भाषेत भूदृश्याचे किंवा चेहऱ्याचे वर्णन करता येत नाही. नेमक्या अशा वैशिष्ट्यांचे वर्णन करण्यासाठी विविध छटा आणि बारकावे दाखवणाऱ्या शब्दांचा प्रचंड पसारा उभा करावा लागेल. असे शब्द अस्तित्वात नाहीत, म्हणून इतर साधनांचा उपयोग करावा लागेल. कवी जेव्हा रस्किन किंवा डक्विन्सी ह्यांच्याप्रमाणे गद्य लिहितो तेव्हासुद्धा तो वाचकाला शब्द, वाक्यांश किंवा वाक्य ह्यांचे जे अनेक संभाव्य अर्थ असतील त्यांपैकी हवे असलेले नेमके विशिष्ट अर्थ निवडायला लावतो. ज्या साधनांनी तो हे करतो ती अनेक आणि विविध प्रकारची असतात. त्यांपैकी काहींचा उल्लेख वर केला आहे. पण त्यांचा उपयोग कवी ज्या पद्धतीने करतो ती पद्धत हे त्याचे स्वतःचे खास असे रहस्य असते. ते शिकवता येण्यासारखे नसते. ते कसे वापरावे हे त्याला समजते. पण ते कसे घडते हे त्याचे त्यालाही माहीत असेलच असे नाही.

काव्यासंबंधी गैरसमज होतो आणि त्याची योग्यता कमी समजली जाते ह्याचे मुख्य कारण काव्याच्या इतर अंगांपासून त्यातला विचार वेगळा कल्पून त्यावर अतिरिक्त भर दिला जातो हे आहे. वाचकाच्या अनुभवाऐवजी जर आपण एक क्षणभर कवीचा अनुभव पाहिला तर विचार

ह्या त्यातला मुख्य घटक नाही हे आपल्याला अधिक स्पष्टपणे दिसून येईल. कवी आपल्या कवितेत अमूकच शब्द वापरतो, दुसरे कोणते वापरीत नाही, ह्याचे कारण काय? त्याला काही विचार–विचार म्हणून– निवेदित करायचे असतात आणि ते शब्द त्या विचाराचे द्योतक असतात म्हणून तो ते वापरतो असे नाही. कविता काय सांगते ह्याला कधीच महत्त्व नसते, ती काय असते ह्याला असते. कवी हा वैज्ञानिकासारखे लिहीत नसतो. तो अमूकच शब्द वापरतो ह्याचे कारण कवितेची वाढ ज्या आस्थांच्या हालचालीवर अवलंबून असते [किंबहुना आस्थांची हालचाल म्हणजेच कवितेची वाढ] त्या आस्थाच एकत्र येऊन ते विशिष्ट शब्द त्या विशिष्ट स्वरूपात कवीच्या सबोध मनात आणतात. जो अनुभव कवितेतून व्यक्त होत असतो त्याचा ते शब्द मुख्य भागच असतात आणि त्या अनुभवाला रूप देण्याचे, त्याचे नियंत्रण करण्याचे, तो संघटित करण्याचे ते साधन असतात. तो अनुभव, मनातून सरसरणारी ती प्रेरणांची लाट, हाच त्या शब्दांचे उगमस्थान आणि त्यांचा आधार असतो. ते शब्द त्या अनुभवाचे द्योतक असतात. बोधनांच्या (perceptions) किंवा विचारांच्या (reflections) एखाद्या संचाचे द्योतक नसतात. पण जर एखादा वाचक त्या कवितेकडे चुकीच्याच मार्गाने गेला तर मात्र त्याला ती कविता म्हणजे इतर वस्तूं-संबंधीच्या विधानांची एक मालिका आहे असे वाटेल. पण योग्य अशा वाचकाच्या मनात त्या शब्दांमुळे आस्थांच्या त्याच लहरी [कवीच्या मनातल्या] निर्माण होतील. तो त्यावेळेपुरता त्याच [कवीच्या] परिस्थितीत असेल आणि त्यामुळे त्याच्या ठिकाणी तेच प्रतिसाद उठतील. पण हे केव्हा? तर त्यासाठी कवितेतले शब्द प्रत्यक्ष अनुभवातून स्फुरलेले असले पाहिजेत. केवळ शब्द वापरण्याच्या सवयीने, छाप पाडण्याच्या इच्छेने, बुद्धिपुरस्सर केलेल्या विचारांचा परिणाम म्हणून, अनुकरणाने, अप्रस्तुत अशा युक्त्यांमुळे किंवा ज्या इतर दोषांमुळे बहुतेक लोक काव्य करण्यापासून परावृत्त होतात त्यांमुळे ते वापरले गेलेले नसावेत.

ह्या परिणाम कसा आणि कशामुळे होतो हे निवेदनप्रक्रियतले एक गूढ आहे. कल्पनातीत जटिल असा प्रेरणांचा समूह शब्दांना एकत्र

आणतो. दुसऱ्याच्या [म्हणजे रसिकांच्या] मनात हीच क्रिया उलट क्रमाने घडते. तिथे शब्दांमुळे प्रेरणांचा तसलाच समूह अस्तित्वात येतो. जे शब्द पहिल्या वेळी [म्ह० कवितेत] अनुभवाचा परिणाम असलेले दिसतात तेच दुसऱ्या वेळी [म्ह० रसिकाच्या बाबतीत] अनुभवाचे कारण होताना दिसतात. घटना विचित्र आहे. निवेदनक्षेत्राच्या बाहेर तंतोतंत असे घडताना आढळत नाही. पण हे वर्णन अगदी अचूक नाही. आपण पाहिलेच आहे की, शब्द हे एका बाबतीत नुसताच परिणाम आणि दुसऱ्या बाबतीत नुसतेच कारण नसतात. दोन्ही बाबतीत ते, अनुभवाला एकत्र बांधून ठेवणारा, त्याची विशिष्ट संरचना करणारा, परस्परांशी संबंधरहित अशा प्रेरणांचा केवळ एक ढिगारा होण्यापासून त्याला प्रतिबंध करणारा असा त्याचा भाग असतात. मक्डूगलने वापरलेले एक रूपक उसने घ्यायचे झाले तर, प्रेरणांच्या ह्या [म्ह० कवितेतल्या] विशिष्ट व्यूहाची ते [कवितेतले] शब्द म्हणजे **किल्ली** आहेत असे म्हणता येईल. अशा पद्धतीने विचार केला तर मग कवी जे लिहितो त्यामुळे वाचकाच्या मनात त्याच्याशी सुसंगत अशा अनुभवाची पुनर्निर्मिती व्हावी हे इतके विचित्र वाटत नाही. पण कितीही विचार केला तरी त्यामुळे कविता ही भाषेच्या सातत्यावर (ती स्थिर किंवा अपरिवर्तनशील असली पाहिजे असे नाही) किती अवलंबून असते हे आपल्याला अधिक चांगल्या प्रकारे जाणवू शकेल असे नाही.

## ३. मूल्यवान म्हणजे काय ?

No longer in Lethean foliage caught
Begin the preparation for your death
And from the fortieth winter by that thought
Test every work of intellect or faith.

W. B. YEATS, *The Winding Stair.*

कविता ही कोणत्या प्रकारची वस्तू आहे ह्यासंबंधीचे विवेचन पुरे झाले. आता आपण 'कवितेचा उपयोग काय ?' 'ती महत्त्वाची का आणि कोणत्या प्रकारे ?' ह्या प्रश्नांचा विचार करू. त्यासाठी आपल्याला आधी हे दाखवून द्यावे लागेल की, ज्या कारणांमुळे * इतर कोणतेही अनुभव मूल्यवान असतात त्याच कारणांमुळे काव्यवाचनाचे अनुभव (जेव्हा ते मूल्यवान असतात तेव्हा) देखील मूल्यवान असतात. त्याच कसोटचा लावून त्यांचे मूल्य ठरवायचे आहे. ह्या कसोटचा कोणत्या ?

ह्यासंबंधी जी मते आहेत त्यांत विलक्षण विविधता आढळून येते आणि ते स्वाभाविक आहे. कारण अनुभव म्हणजे काय ह्यासंबंधीच मुळी वेगवेगळचा कल्पना असलेल्या दिसून येतात. चांगले अनुभव कोणते आणि वाईट अनुभव कोणते ह्यासंबंधीची आपली मते अपरिहार्यपणेच अनुभव म्हणजे काय ह्यासंबंधीच्या आपल्या विचारावर अवलंबून असतात. मनोविज्ञानात जसजशी नवनवी मते येत गेली तसतसे

* विवेचनासाठी घेतलेली ही 'कारणे' कितो खोलवर जाणारी आहेत ह्याचाच निर्णय ह्या ठिकाणी केलेला आहे.

माणसांचे नीतिविषयक सिद्धांतही बदलत गेले. ईश्वराकडून निर्माण केला गेलेला निरवयव (simple) आणि अविनाशी आत्मा हा जेव्हा सर्व मनोव्यापारांचे केन्द्र मानला गेला होता तेव्हा सद्वर्तन म्हणजे निर्मात्याच्या इच्छेनुसार वर्तन आणि दुर्वर्तन म्हणजे त्याच्या इच्छेविरुद्ध वर्तन असे मानले जात होते. संवेदना आणि प्रतिमा ह्यांचा पुंज ह्याला जेव्हा साहचर्यवादी मनोवैज्ञानिकांनी आत्म्याचे स्थान दिले तेव्हा सुखकारक ते चांगले आणि दुःखकारक ते वाईट असे मानले जाऊ लागले. ह्या बदलांच्या मागोमाग नीतिविषयक मते कशी बदलत गेली त्याचा मोठा इतिहास अजून लिहिला जायचा आहे. मन म्हणजे नानाविध आस्थांची सेन्द्रिय सोपानपरंपरा असे मानले तर चांगले आणि वाईट ह्यात फरक कसा करावयाचा ?

प्रस्तुत विवेचनाच्या संदर्भात आपण असे म्हणू की, मुक्त संघटना आणि जीवनाची समृद्धता म्हणजे चांगले आणि अपव्ययकारक संघटना आणि जीवनाची संकुचितता म्हणजे वाईट. मन म्हणजे आस्थांचा व्यूह आणि अनुभव म्हणजे त्यांची हालचाल असे मानले तर मग ह्या हालचालीच्या द्वारा ज्या मानाने मन अधिक व्यापक समतोलाकडे जाईल त्या मानाने त्या अनुभवाचे मूल्य राहील.

हे स्थूल विधान झाले. ह्याचे जर समाधानकारक सिद्धांतात रूपान्तर व्हायला हवे असेल तर त्यात बऱ्याच सुधारणा कराव्या लागतील आणि त्याचा विस्तार करावा लागेल. ह्या सुधारणा कोणत्या असू शकतील ते आपण पाहू.

कोणत्याही एखाद्या माणसाच्या आयुष्यातला एक तास आपण विचारासाठी घेऊ. तासाभराच्या ह्या अवधीत असंख्य गोष्टी घडू शकतील. पण प्रत्यक्षपणे काय काय घडेल ते दोन गटात विभागलेल्या घटकांवर अवलंबून राहील. एक गट म्हणजे ज्या बाह्य परिस्थितीत तो राहतो ती परिस्थिती. ह्यात त्याचा परिसर आणि ज्या माणसांशी त्याचा संबंध येतो ती माणसे ह्यांचा अंतर्भाव होतो. आणि दुसरा गट म्हणजे त्याची मानसिक घडण. ह्यापैकी बाह्य परिस्थितीला — राजकारणात जरी नाही तरी एरव्ही — अवास्तव महत्त्व दिले जाण्याची शक्यता आहे. सजीव वस्तू आणि परिसर (organism and environment) ह्या दोन

स्वतंत्र गोष्टी नाहीत ह्याची जीवशास्त्रज्ञ आपल्याला अलीकडे आठवण करून देऊ लागले आहेत. अगदी एकसारख्या परिस्थितीत असणाऱ्या वेगवेगळ्या लोकांना किती वेगवेगळ्या प्रकारचे अनुभव येतात हे पाहिले म्हणजे त्यांचे म्हणणे पटते. जी परिस्थिती एखाद्याला अत्यंत कंटाळवाणी वाटेल तीच दुसऱ्याला अत्यंत उत्तेजक वाटेल. मनुष्य प्रतिसाद देतो तो सबंधच्या सबंध परिस्थितीला नाही तर तिच्यातून तो काही निवड करतो, आणि सारखीच निवड फारच थोडे लोक करतात. कशाची निवड केली जाईल – म्हणजेच प्रस्तुत (relevant) परिसर कोणता – हे त्या त्या व्यक्तीच्या आस्थांच्या संघटनेवर अवलंबून राहील.

हे उदाहरण आणखी सोपे करण्यासाठी आपण असे समजू या की, ह्या तासाभराच्या अवधीत जे काही घडेल त्याचा, उदाहरणासाठी घेतलेल्या त्या माणसाच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही माणसाच्या जीवनावर पुढे काहीही परिणाम होणार नाही. हा तास संपला की, त्याचे आयुष्य संपणार आहे – पण ह्या विवेचनाचा आपला उद्देश लक्षात घेता [आपले आयुष्य संपणार आहे] हे त्याला मुळीच माहीत नाही अशी कल्पना करायची आहे – आणि ह्या तासाभराच्या अवधीत तो जो विचार करील, किंवा त्याला जे वाटेल किंवा तो जे काही करील त्याचा कोणावरही काहीही बरा किंवा वाईट परिणाम होणार नाही. ह्या तासाभरात त्याला काही करता येणार असेल तर त्याने काय करणे सर्वांत चांगले असे आपल्याला म्हणता येईल ?

ह्या माणसाची बाह्य परिस्थिती किंवा त्याचे व्यक्तिवैशिष्ट्य ह्याचा विचार करण्याचे आपल्याला कारण नाही. ह्या कशाचाही विचार न करता आपण आपल्या प्रश्नाचे उत्तर स्थूलमानाने देऊ शकतो. पूर्वायुष्य आणि आनुवंश्य ह्यांचा परिणाम म्हणजे त्याच्या व्यक्तित्वाची घडण. तिच्यात काही विशिष्ट उपजत प्रवृत्ती आणि अर्जित प्रवृत्ती ह्यांचा अंतर्भाव असेल. अशा बऱ्याच गोष्टी असतील की, त्या दुसऱ्या एखाद्या माणसाला करता येतील, पण ह्याला करता येणार नाहीत. त्याचप्रमाणे अशाही बऱ्याच गोष्टी असतील की ज्या त्याला ह्या विशिष्ट परिस्थितीत करता येणार नाहीत पण दुसऱ्या एखाद्या परिस्थितीत – मग ती कोणतीही असो – करता येतील. पण आपल्यापुढे असा प्रश्न

आहे की, आपण उदाहरण म्हणून घेतलेला हा विशिष्ट माणूस आणि ही विशिष्ट परिस्थिती लक्षात घेता ह्या परिस्थितीत त्याला ज्या अनेक गोष्टी करणे शक्य आहे त्यांपैकी त्याने कोणत्या गोष्टी करणे – दुसऱ्या कोणत्या गोष्टी करण्यापेक्षा – अधिक चांगले ठरेल? त्याच्याविषयी मित्रत्वाची भावना असलेले निरीक्षक म्हणून, त्याने हा तास कशा प्रकारे घालवणे आपल्याला आवडेल?

दुःखकारक होईल ते आपण सोडून देऊ. तेवढे वगळता आपण असे म्हणू की, संज्ञाहीन अवस्थेत त्याला हा तास घालवावा लागला तर ती सगळ्यात वाईट निवड ठरेल. संपूर्णपणे निष्क्रिय अवस्था, निर्जीव अवस्था, ही तर फारच वाईट अवस्था ठरेल. तास संपल्याबरोबर जे घडणारच आहे ते निष्कारणच आगाऊ अधिक जवळ आणल्यासारखे होईल. हे जीवन जर निवडायचे नसेल तर मग आपण असे म्हणू की, असंज्ञ जीवनाच्या विरुद्ध असे जीवन म्हणजे अत्यंत समृद्ध, अत्यंत उत्कट, अत्यंत कृतिपूर्ण आणि अत्यंत परिपूर्ण असे जीवन त्याने निवडणे हे सगळ्यात चांगले ठरेल. मात्र ह्या निवडीच्या बाबतीत पूर्वसिद्ध विचारां-कल्पनांमुळे अधिक प्रतिकार होण्याची शक्यता आहे.

अशा प्रकारच्या जीवनात धनरूप आस्थांपैकी जास्तीत जास्त आस्थांना वाव मिळेल. ऋणरूप आस्था आपण बाजूलाच सारू शकू. तासा-भराच्या ह्या बहुमोल अवधीमध्ये एक मिनिटभर जरी आपल्या मित्राला भीती किंवा जुगुप्सा वाटली तर ती फार वाईट वाटण्यासारखी गोष्ट होईल.

पण एवढ्यानेच भागणार नाही. बऱ्याचशा आस्थांमध्ये हालचाल व्हावी एवढेच पुरेसे नाही. ह्याहूनही अधिक महत्त्वाचा असा एक मुद्दा लक्षात घेतला पाहिजे.

"देवतांना आत्म्याची सखोलता आवडते, खळखळाट आवडत नाही."

(The Gods approve
the depth and not the tumult of the Soul)

आस्था जागृत व्हाव्यात आणि क्रियाशील राहाव्यात, पण त्यांच्यात परस्परसंघर्ष शक्य तितका कमी असावा. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर असे म्हणता येईल की, अनुभव अशा रीतीने संघटित व्हावा की,

त्यामुळे त्यात अंतर्भूत झालेल्या सगळ्या प्रेरणांना जास्तीत जास्त जितके स्वातंत्र्य मिळू शकेल तितके मिळावे.[१]

ह्या बाबतीतच लोकांमध्ये सगळ्यात अधिक भिन्नता असते. चांगले जीवन आणि वाईट जीवन ह्यांतील भेद ह्यातूनच निर्माण होतो. संधीच्या अभावामुळे जेवढा जीवनाचा अपव्यय होतो त्यापेक्षा किती तरी अधिक अव्यवस्थित अशा मानसिक संघटनेतून होतो. मनोव्यवस्था सुधारण्याची एक आवश्यक पद्धत म्हणून जेव्हा वेगवेगळ्या प्रेरणांत संघर्ष होतो तेव्हाची गोष्ट वेगळी. पण जेव्हा तसे नसेल तेव्हा विविध प्रेरणांत संघर्ष असणे हे मानवजातीला अत्यंत अनिष्ट आहे हे मानसोपचारतज्ञ जाणतो.

म्हणून मग [असे म्हणावे लागेल की] आपल्या मते आपल्या मित्राच्या बाबतीत सगळ्यात चांगले जीवन कोणते ? तर त्याच्या व्यक्तिमत्वाचा जास्तीत जास्त भाग ज्यात गुंतेल ते. आणि तेही अशा रीतीने की, त्याच्या कृतींच्या वेगवेगळ्या उपव्यूहात शक्य तितका कमी परस्पर संघर्ष, कमीत कमी निराशाजनक असा परस्पर अडथळा, उत्पन्न व्हावा. तो जितका अधिक परिपूर्ण जगेल आणि जितका कमी स्वतःला प्रतिबंध करील तितके अधिक चांगले. आपण जी परिस्थिती चर्चेसाठी घेतली आहे तिचे स्थूलमानाने (abstract) वर्णन करणारे तटस्थ निरीक्षक म्हणून आपल्याला आपण विचारलेल्या प्रश्नाचे वरील प्रमाणे उत्तर देता येईल. आणि जर असे विचारले की, असे जीवन जगत असताना कसे वाटते ? किंवा असे जीवन कसे जगले जाते ? तर त्याचे उत्तर असे आहे की, कवितेचा अनुभव घेत असल्यासारखे वाटते आणि असे जीवन म्हणजे कवितेचा अनुभव.

संघर्ष टाळण्याचे किंवा त्यावर वर्चस्व मिळवण्याचे दोन मार्ग आहेत. विजय मिळवून किंवा तडजोड घडवून. परस्परविरोधी प्रेरणांपैकी एखादी दडपून टाकता येते. किंवा त्यांच्यात परस्पर तडजोड निर्माण होऊन त्या एकमेकींशी जुळवून घेऊ शकतात. एखादी जोरदार प्रेरणा दडपून टाकणे किती कठीण असते ह्याचा भरपूर पुरावा आपल्याला

---

[१] अशा अनुभवाच्या वर्णनासाठी पाहा : *The Foundations of Aesthetics*: C. K. Ogden, James Wood आणि प्रस्तुत ग्रंथकार पृ. ७४ आणि पुढे.

मनोविश्लेषणाने दिलेला आहे. जेव्हा ती दडपली गेल्यासारखी दिसते तेव्हा बहुधा ती दुसऱ्या एखाद्या स्वरूपात, आणि तीही सामान्यपणे उपद्रवकारक स्वरूपात, पूर्वीइतकीच कृतिप्रवण असलेली दिसून येते. बहुतेक सर्व मानसिक तक्रारींचे मूळ सतत अस्तित्वात असलेल्या मानसिक असंतुलनात असते. ह्या कारणासाठी, त्याचप्रमाणे दडपण हे जीवनाचा अपव्यय करणारे असते ह्या अधिक साध्या कारणासाठी देखील, विजय मिळवण्यापेक्षा, तडजोड घडवून आणणे अधिक इष्ट. जे लोक नेहमी स्वतःवर विजय मिळवीत असतात ते लोक एक प्रकारे नेहमी स्वतःला गुलाम करीत असतात असे म्हणता येईल. त्यांचे जीवन निष्कारणच संकुचित होते.

पण दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की, दुसरे काही साहाय्य नसेल तर, आपल्यापैकी बहुतेकांना स्वतःवर विजय मिळवण्याचे व्यापक प्रमाणावर प्रयत्न करीत राहाण्याखेरीज गत्यंतर नसते. गोंधळातून सुटका करून घेण्याचा तो आपला एकच मार्ग असतो. आपल्या प्रेरणांमध्ये जर काही तरी व्यवस्था, काही तरी संघटना, नसेल तर दहा मिनिटे-सुद्धा आपण निःसंकट जगू शकणार नाही. पूर्वीच्या काळी परंपरा आपल्या जीवनाला थोडेबहुत समाधानकारक वळण लावीत असे. तो एक प्रकारचा व्हेर्सायचा तहच होता. वेगवेगळ्या आस्थांची प्रभाव-क्षेत्रे आणि त्यांच्या सीमा त्यात आखून दिलेल्या असत. त्याही मुख्यतः संपादिलेल्या विजयावरच आधारलेल्या असत. पण आता परंपरा दुबळी होत चालली आहे. नैतिक कल्पनांना आता पूर्वीसारखा श्रद्धांचा आधार राहिलेला नाही. त्यांच्यामागली शासनशक्ती ओसरत चाललेली आहे. पूर्वीच्या व्यवस्थेची जागा घेण्यासाठी दुसऱ्या कशाची तरी आपल्याला आता आवश्यकता आहे. नवीन सत्ता-समतोल किंवा विजयावर आधारलेली एखादी नवी व्यवस्था आपल्याला नको आहे. प्रेरणांच्या नैतिक व्यवस्थापनासाठी राष्ट्रसंघासारखी एखादी यंत्रणा हवी आहे. दडपणाच्या प्रयत्नावर आधारलेली नव्हे तर तडजोडीवर आधारलेली नवी व्यवस्था.

अशी व्यवस्था निर्माण करणे आतापर्यंत फारच थोड्या लोकांना साधले आहे आणि त्यांनाही ते नित्याचे सामाजिक जीवन विस्कळित

केल्यावाचून साधलेले नाही. ब्लेकचे उदाहरण आपल्याला घेता येईल. पण बऱ्याच जणांना अशी व्यवस्था अल्प कालावधीपुरती, विशिष्ट अनुभवावस्थेपुरती, साधलेली आहे आणि बऱ्याच जणांनी ह्या अनुभवावस्थेची नोंद करून ठेवलेली आहे. ह्या नोंदी म्हणजेच कविता.

पण ह्या नव्या मुद्याकडे जाण्यापूर्वी, ज्याला जगण्यासाठी एकच तास मिळालेला आहे त्या आपल्या उदाहरणातल्या मित्राकडे पुन्हा वळू या. त्याला दिलेली एका तासाची मर्यादा आपण आता काढून टाकू या. ह्या अखेरच्या एका तासाऐवजी त्याच्या जीवनातला कोणताही एक तास घेऊ या. ज्या तासाचा त्याच्या आणि इतरांच्याही भावी जीवनावर परिणाम होईल असा किंवहुना कोणत्याही जीवनाचा कोणताही कालावधी घेऊ या. तसे समजले तर आपण आताच जो विचार मांडला त्यावर काही परिणाम होईल का ? चांगले आणि वाईट ह्यासंबंधीचे मानदंड बदलले जातील का ?

आता जी परिस्थिती आपण विचारासाठी घेत आहो ती काही बाबतीत पूर्वीच्यापेक्षा वेगळी आहे हे उघड आहे. ती अधिक गुंतागुंतीची आहे. तिचे संभाव्य परिणाम आपल्याला विचारात घेतले पाहिजेत. आता आपल्याला त्याच्या अनुभवाचा तेवढ्यापुरताच विचार करायचा नाही, तर त्याच्या जीवनाचा एक भाग म्हणून आणि इतरांच्या जीवन-प्रसंगाचा एक घटक म्हणून करायचा आहे. माणूस हा एक सामाजिक प्राणी आहे ह्याची आपण जाणीव ठेवायला हवी. कल्पनेने त्याचे एक प्रकारे अमानुषीकरण (dehumanizing) करूनच आपण त्याचा व्यक्ती म्हणून विचार करतो. म्हणूनच अशा परिस्थितीत उपस्थित केलेल्या नैतिक प्रश्नांत एक अंतर्विरोध असतो. त्याचा अनुभव जर आपल्याला मान्य व्हायचा असेल तर तो नुसता जीवनाने परिपूर्ण आणि संघर्षरहित असून भागणार नाही. त्यातून त्याच्यासाठी आणि इतरांसाठी दुसरे अनुभव निर्माण होणे शक्य झाले पाहिजे आणि तेही जीवनाने परिपूर्ण आणि संघर्षरहित असले पाहिजेत. आणि हे भावी अनुभव सुरक्षित राहावेत ह्यासाठी बरेच वेळा प्रस्तुतचा अनुभव प्रत्यक्षत:, एरवी झाला असता त्यापेक्षा, कमी जीवनपूर्ण आणि अधिक मर्यादित करावा लागतो. भविष्यकाळातल्या आणि अधिक व्यापक 'चांगल्या' साठी बरेचदा

तात्कालिक आणि व्यक्तिगत ‘ चांगल्या ’ चा त्याग करावा लागतो. नंतर संघर्ष निर्माण होऊ नयेत म्हणून आधी काही संघर्ष होऊ देणे बरेचदा आवश्यक असते. परस्परविरोधी प्रेरणांमध्ये तडजोड होण्यासाठी वेळ लागणे शक्य आहे. भावी काळात एकमेकींशी शांतपणे सहकार्य करणे आणि अधिक संघटित अशा जीवनपद्धतीत स्वत:ला परिवर्तित करून घेणे ह्यासाठी आधी त्यांच्यात तीव्र संघर्ष होणे हाच एक मार्ग असू शकेल.

पण ह्या सगळ्या गुंतागुंतीमुळे किंवा न्यूनाधिक्यामुळे आपण अधिक साध्या प्रसंगाचा विचार करून जी अनुमाने काढली होती त्यांना काही बाधा येत नाही. चांगला अनुभव हा जीवनपूर्ण असतो किंवा जीवनपूर्ण अनुभवांचा प्रेरक असतो असे ज्या अर्थाने आपण म्हटले त्या अर्थाने ह्याही अनुभवांच्या बाबतीत ते खरेच आहे. जो अनुभव आत्म-विरोधी असतो किंवा जीवन संकुचित करणाऱ्या संघर्षांना कारण होतो तो अनुभव वाईट. आतापर्यंतचे विवेचन युक्तिवाद म्हणून तरी निर्दोष आणि व्यवस्थित आहे. ह्यानंतर आपण कवीसंबंधी विचार करू.

A-2020—4-B.




## ४. जीवनावर प्रभुत्व

Eyes, ears, tongue, nostrils bring
News of revolt, inadequate counsel to
An infirm king.

W. H. AUDEN, *Paid on Both Sides.*

कवींचे मुख्य वैशिष्टय म्हणजे त्यांचे शब्दांवरचे आश्चर्यकारक प्रभुत्व. हा केवळ कवीजवळ असलेल्या शब्दसंग्रहाचा प्रश्न नाही. इतर कोणत्याही इंग्लिश कवीच्या मानाने शेक्स्पिअरचा शब्दसंग्रह अधिक समृद्ध आणि अधिक विविध आहे ही गोष्ट महत्त्वाची आहे हे मात्र खरे. कोणत्याही कवीला कविपद प्राप्त होते ते त्याच्याजवळ असलेल्या शब्दांच्या संख्येमुळे नाही तर त्या शब्दांचा वापर तो ज्या पद्धतीने करतो त्या पद्धतीमुळे. शब्दांचा परस्परांवर कसा परिणाम होतो, त्यांचे मनावर होणारे वेगवेगळे परिणाम कसे एकत्रित होतात, मनाकडून होणाऱ्या संपूर्ण प्रतिसादामध्ये ते कसे चपखल बसतात ह्यासंबंधीची त्याची जी जाण असेल तिला खरे महत्त्व आहे. अमुकच शब्द अमुक ठिकाणी अत्यंत उचित का आणि दुसरे का नाहीत ह्याच्या कारणांची स्पष्ट जाणीव सामान्यतः कवीला नसते. ते आपापल्या जागी जाऊन बसतात त्यात त्याने बुद्धिपुरस्सर केलेल्या नियंत्रणाचा भाग नसतो. आपण केलेले शब्दांचे व्यवस्थापन यथायोग्य आहे ह्याबद्दल त्याला जी खात्री वाटते तिचा

सामान्यत: त्याला माहीत असलेला एकमेव आधार म्हणजे त्यासंबंधीच्या औचित्याची, अपरिहार्यतेची, त्याला झालेली जाणीव. त्याने अमुकच छंद का वापरला किंवा अमुकच विशेषण का वापरले असे विचारणे सामान्यपणे निरर्थक असते. तो कदाचित कारणे सांगेल, पण ते केवळ समर्थन असेल. त्याचा मूळ प्रश्नाशी काही संबंध नसेल. विशिष्ट छंदाच्या किंवा विशिष्ट विशेषणाच्या योजनेचे पश्चात्-समर्थन करता येईल. पण त्याची जी निवड झाली ती बुद्धीवर आधारलेली म्हणजेच विश्लेषणीय नव्हती. ती त्याच्या आस्थेची एक हालचाल होती. स्वत:ला दृढ करून घेण्यासाठी, किंवा इतर आस्थांबरोबर जुळवून घेण्यासाठी केलेली. अर्थात तिचे बुद्धिनिष्ठ समर्थन होऊ शकणार नाही असे नाही.

कवीकडून होणाऱ्या शब्दयोजनेची कारणे किती खोल वसत असतात हे जाणून घेणे फार महत्त्वाचे आहे. एखाद्या कवीने दुसऱ्या कवीच्या काव्यांचा कितीही अभ्यास केला तरी तो जर भावनोत्कट अभ्यास नसेल तर त्याचा त्याला काहीही उपयोग होणार नाही. इतर कवींपासून त्याला पुष्कळ शिकता येईल. पण ते त्याने आपल्यावर त्यांचा खोल प्रभाव पडू दिला तरच. त्यांच्या 'शैली' चे वरवर परीक्षण करून नाही. कारण कवितेला आकार देणाऱ्या प्रेरक शक्ती मनाच्या गाभ्यातून स्फुरत असतात. कवीची शैली हा त्याच्या आस्था ज्या प्रकारे संघटित झाल्या असतील त्याचा प्रत्यक्ष परिणाम असतो. आपल्या अनुभवाला व्यवस्थित रूप देण्याचे त्याच्या ठिकाणी जे अद्‌भुत सामर्थ्य असते त्याचा एक अंश म्हणजे त्याचे शब्दयोजनेचे अद्‌भुत सामर्थ्य.

केवळ चातुर्याच्या आणि व्यासंगाच्या, कौशल्याच्या आणि जुळवा-जुळवीच्या बळावर कविता लिहिली जाऊ शकत नाही ह्याचे हे कारण आहे. पूर्वसूरींच्या काव्यात मुरलेल्या, उत्कट अनुकरणबुद्धीने आणि कवींच्या पंक्तीत बसण्याच्या तीव्र इच्छेने प्रेरित झालेल्या एखाद्या पढिकाची रचना वरवर पाहताना अगदी कवितेसारखीच दिसेल. शब्दयोजना जितक्या सूक्ष्मपणे आणि हळुवारपणे करणे शक्य आहे तितकी ती केली आहे असे वाटेल. विशेषणांची योजना अत्यंत उचित, कल्पनासंक्रमण धिटाईचे आणि साधेपणा अगदी चांगल्या कवितेतल्या सारखाच निर्दोष वाटेल. बुद्धीचा कोणताही निकष लावला तरी तो त्याला अनुकूल

ठरेल. पण त्याची शब्दयोजना खरोखरच जर अनुभवाच्या उत्कृष्ट व्यवस्थापनातून स्फुरलेली नसेल, आणि केवळ काव्यरचना-तंत्राचे ज्ञान आणि कविता करण्याची इच्छा ह्यांवरच आधारलेली असेल, तर त्याच्या कवितेचे थोडयाशा बारकाईने परीक्षण केल्यावरोबर तिचा फोलपणा उघडा पडल्यावाचून राहणार नाही. विशेष म्हणजे तिच्यासाठी वापरलेला छंदच ही गोष्ट उघड करील. कारण छंद म्हणजे मात्रांचा खेळ नव्हे. ते कवीच्या व्यक्तिमत्वाचे प्रत्यक्ष प्रतिबिंबच आहे. शब्द आणि छंदाची लय ही वेगळी करता येत नाहीत. कवितेचा धावत्या लयीचा छंद खरोखरीच उत्तेजित झालेल्या प्रेरणांतूनच स्फुरतो. आणि आस्थांचे व्यवस्थापन कशा रीतीने झाले आहे ह्याचे निदर्शन त्याच्याइतके सूक्ष्मपणे दुसऱ्या कशानेही होऊ शकत नाही.

ह्याचा अर्थ असा की, कवितेची नक्कल होऊ शकत नाही. कवितेला जी एकच एक कसोटी लावली गेली पाहिजे ती लावली तर तिला उतरू शकेल अशी खोटी कविता निर्माण होऊ शकत नाही. मात्र दुर्दैवाची गोष्ट अशी आहे की, ही कसोटी लावणे पुष्कळदा फार कठीण असते. आणि ही कसोटी लावली गेली आहे अशी खात्री बाळगणे नेहमीच धोक्याचे असते. ती कसोटी ही. कवी हा शब्दप्रभू असतो. कारण काव्य-निर्मितीच्या क्षणी तो अनुभूतीचाच प्रभू असतो. कवीचा अनुभव जितका उत्कट, उदात्त आणि प्रसन्न असतो तितकाच उत्कट, उदात्त आणि प्रसन्न प्रतिसाद, उचित रीतीने कवितेचा आस्वाद घेणाऱ्या वाचकाच्या अंतःकरणात केवळ जातिवंत कविताच निर्माण करू शकते. पण इतर शब्दांप्रमाणेच 'उत्कट', 'उदात्त', 'प्रसन्न' ह्या शब्दांचाही दुरुपयोग होऊ शकतो. त्यामुळे आपल्याला त्यांपैकी कशावरही विसंबता येत नाही. आणि सर्वगामी स्वयंपूरक (Omniform self-completing) अशा मानसिक हालचालींसंबंधीच्या इतर एखाद्या कसोटीवर तर तितकेही विसंबता येत नाही. जर कविता जातिवंत असेल तर त्याचा प्रत्यय येईलच – पण तो आपल्यालाच येईल किंवा तत्काल येईल असे नाही. शिवाय दुसरी गोष्ट अशी की, कवितेचे वाचन निष्काळजीपणे आणि उथळपणे होणे शक्य आहे. तसेच जो वस्तुतः तिचा प्रतिसाद नाही त्यालाच 'प्रतिसाद' मानणेही सहज शक्य आहे. निष्काळजी वाचनामुळे

कवितेचे रहस्य आपल्या हातून निसटते, आणि मनाच्या काही अवस्थांमध्ये – उदाहरणार्थ मद्याची धुंदी चढली असेल तर – अत्यंत भिकार पद्यरचनाही उदात्त वाटू शकेल. जे घडले ते कवितेमुळे नाही तर मद्यामुळे.

आतापर्यंत मांडलेले विचार लक्षात ठेवून आता आपण "नुकतेच उदयाला येऊ लागलेले मानसशास्त्र आपल्याला काव्यासंबंधी काय सांगते ?" – ह्या प्रश्नाकडून पुढल्या – त्याच्याशीच संबद्ध असलेल्या – प्रश्नाकडे जाऊ. तो असा की, सामान्यपणे विज्ञानाचा – आणि त्यामुळे निर्माण झालेल्या जगासंबंधीच्या नव्या दृष्टिकोणाचा – काव्यावर काय परिणाम होऊ लागला आहे ? आणि विज्ञानामुळे भूतकाळातील काव्य कितपत कालबाह्य ठरणार आहे ? ह्या प्रश्नांचे उत्तर देण्यासाठी आपल्याला दोन गोष्टी केल्या पाहिजेत. एक म्हणजे जगासंबंधीच्या आपल्या दृष्टिकोणात अलीकडे जे बदल झाले आहेत त्यांपैकी काहींचे स्थूल स्वरूप रेखणे, आणि दुसरे म्हणजे काव्यापासून आपण कशाची अपेक्षा करतो ह्याचा नव्याने विचार करणे.




## ५. निसर्गाचे अमानवीकरण

All those large dreams by which men long live well
Are magic-lanterned on the smoke of hell ;
This then is real, I have implied,
A painted, small, transparent slide.

WILLIAM EMPSON.

कविता वाचून झाल्यानंतर आपल्यात काही बदल झाला आहे असे आपल्याला जर आढळले नाही तर एक तर कवितेत तरी दोष आहे किंवा आपल्यात तरी दोष आहे असे म्हणावे लागेल. म्हणजे जेवण किंवा झोप झाल्यानंतर ज्या प्रकारचा बदल होतो आणि ज्यानंतर काही वेळाने पुन्हा आपण अपरिहार्यपणे पूर्वस्थितीवर येतो त्या प्रकारचा तात्पुरता बदल नव्हे. तर नित्य आपल्यावर जवळजवळ कोसळणाऱ्या नाना प्रकारच्या चेतनांशी बऱ्या-वाईट प्रकारे जुळवून घेण्यासाठी त्यांना प्रतिसाद देणाऱ्या व्यक्ती ह्या नात्याने, प्रतिसाद देण्याच्या आपल्या संभाव्य पद्धतीतच घडून येणारा कायमचा बदल. सद्यःकालीन कवितेपैकी किती कविता अशा प्रकारचा खोलवर जाणारा बदल घडवून आणण्याला समर्थ आहे? तारुण्यसुलभ आकर्षणे आपण बाजूला ठेवू या. बहुतेकांच्या जीवनात असा एक काल असतो की, त्यावेळी त्यांच्या नुकत्याच उमलू लागलेल्या मनावर मेसफील्ड, किप्लिंग, ड्रिंकवॉटर, इतकेच नाही तर नॉयझ आणि स्टडर्ट केनेडी ह्यांच्या कवितेचा खोल परिणाम होतो आणि ते योग्यही

आहे. उमलू लागलेल्या मनाचा तो कवितेशी प्रथम परिचय असतो. किंवा असे म्हणू या की, छंदोबद्ध शब्दांच्या द्वारा–पूर्णपणे नियंत्रित केला गेलेला नसला तरी–उत्तेजित केल्या गेलेल्या भावनात्मक अनुभवाशी परिचित होण्याची त्यावेळी शक्यता सुरू होते.[1] काही काळानंतर मग मागे वळून पाहताना असे दिसून येते की, इतर शेकडो कवींपैकी कोणाचीही कविता वाचली असती तरी चालले असते. म्हणून आपण केवळ अनुभवी वाचकच उदाहरणादाखल म्हणून घेऊ या. सद्यःकालीन परिस्थितीच्या नाना प्रकारच्या दडपणांनी घडवलेला आणि त्यांना प्रतिसाद देणारा, त्याचप्रमाणे भूतकालीन कवितेच्या विविध प्रकारांशी चांगल्या प्रकारे परिचित असलेला असा.

योगायोगाची गोष्ट सोडली तर सद्यःकालीन कवितेपैकी जी कविता आजच्याखेरीज इतर काळात लिहिली गेली नसती तीच अशा वाचकांच्या दृष्टिकोणात बदल घडवून आणू शकेल. ती कविता काही अंशी सद्यःकालीन परिस्थितीतून स्फुरलेली असेल. ती अशा गरजा, प्रेरणा, आणि दृष्टिकोण ह्यांतून निर्माण झालेली असेल की, ते त्याच स्वरूपात पूर्वकालीन कवींच्या समोर आले नसतील. त्याचप्रमाणे अशा वाचकाकडून जुनी कविता नव्या पद्धतीने वाचली जाईल. पण कदाचित हे मान्य करायला आपण तितकेसे तयार होणार नाही. दृष्टिकोण बदलला की, सगळे बदलते ("The eye altering alters all"). इतर वस्तूंप्रमाणेच कविता देखील ज्या आस्थांच्या द्वारा आपण तिचे ग्रहण करतो त्यांच्यापासून स्वतंत्र नसते. मनुष्य, निसर्ग आणि त्या दोहोंना सामावून घेणारे विश्व, ह्यांसंबंधीचे आपले दृष्टिकोण दर पिढीला बदलत असतात आणि अलीकडल्या काळात ते फार व्यापक प्रमाणात आणि खोलपणे बदलले आहेत. आधुनिक कवितेसंबंधी चर्चा करताना हे बदल दृष्टीआड करून चालणार नाही. मात्र त्यांवर आधारलेले युक्तिवाद कवितेच्या मूल्यमापनासाठी ग्राह्य ठरणार नाहीत. दृष्टिकोण बदलत असले म्हणजे समीक्षा स्थिर राहू शकत नाही किंवा कविताही स्थिर राहू शकत

[1] टी. एस. एलियटच्या *The Use of Poetry* ह्या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणाच्या शेवटी प्रशंसनीय आणि महत्त्वाची *Note on the development of taste in poetry* आहे ती पाहा (Barnes & Noble, Inc., 1955).

नाही. कवी कोणाला म्हणावे ह्याची ज्यांना जाणीव आहे त्यांना ही गोष्ट सहज समजेल. वाङ्मयाचा सबंध इतिहास ह्याला साक्षी आहे.

अलीकडल्या काळातल्या मुख्य-मुख्य बौद्धिक क्रान्त्यांची यादी देणे आणि काव्याच्या बाबतीत काय घडत असेल ह्यासंबंधी त्यावरून अनुमान काढण्याचा प्रयत्न करणे ह्याचा फारसा उपयोग होणार नाही. मनात झालेल्या बदलांचे आपल्या दृष्टिकोणावर झालेले परिणाम इतके गुंतागुंतीचे आहेत की, त्यांच्यावरून असे गणित करता येणार नाही. आपल्याला लोकांच्या प्रचलित मतांचा विचार करायचा नाही, तर त्यांच्या दृष्टिकोणांचा विचार करायचा आहे. जगाचाच एक भाग म्हणून ह्या किंवा त्या गोष्टींविषयी त्यांची भावना काय आहे, त्याच्या वेगवेगळ्या अंगांपैकी कोणत्या अंगांचे त्यांना किती महत्त्व वाटते, कोणत्या गोष्टीसाठी कोणत्या गोष्टीचा त्याग करायची त्यांची तयारी आहे, त्यांचा विश्वास कोणत्या गोष्टीवर आहे, त्यांना भीती कोणत्या गोष्टीची वाटते, त्यांना इच्छा कशाची आहे, हे आपल्याला पाहायचे आहे. ह्या गोष्टी कळून घेण्यासाठी आपल्याला कवींकडे गेले पाहिजे. ते जर आपला अपेक्षाभंग करीत नसतील तर ते आपल्याला नेमक्या ह्या गोष्टी दाखवतील.

ते ह्या गोष्टी आपल्याला दाखवतील, सांगणार नाहीत. शरीरशास्त्रावरचा एखादा प्रबंध शरीराच्या रचनेसंबंधी जसे आपल्याला काही सांगतो तसे त्यांची कविता त्यांच्या दृष्टिकोणासंबंधी आपल्याला काही सांगणार नाही. ती दृष्टिकोणातून स्फुरलेली असते आणि अधिकारी अशा वाचकाच्या अंतःकरणात ती ते दृष्टिकोण स्फुरवील. पण सामान्यपणे ती कोणत्याही दृष्टिकोणाचा निर्देश करणार नाही. आणि जेव्हा तसा निर्देश केलेला असेल तेव्हा तो नाटकात जशी पात्रे प्रवेश करतात तसा साधन म्हणून केलेला असेल. मानसिक घटनांसंबंधी अधूनमधून कोणी तरी एखादा पद्यबद्ध निबंध रचील हे अर्थातच शक्य आहे. पण त्यामुळे आपण आपली दिशाभूल होऊ देता कामा नये. कवितेशी ज्यांचा संबंध येतो ते बहुतेक दृष्टिकोण वर्णनातीत असतात हे मागे दुसऱ्या प्रकरणात सांगितले आहे, आणि त्याची कारणेही सूचित केली आहेत. ज्या प्रसंगांतून ते जागृत होतात त्या प्रसंगांच्या

(म्हणजे कवितांच्या) द्वाराच ते अप्रत्यक्षपणे निर्दिष्ट किंवा सूचित केले जातात. कविता–म्हणजेच अधिकारी अशा वाचकाच्या मनात आकार घेत जाणारा, जगासंबंधीच्या त्याच्या प्रतिसादांचे नियंत्रण करणारा, आणि त्याच्या प्रेरणांचे व्यवस्थापन करणारा अनुभव–आपल्या उद्दिष्टांसंबंधी सामान्यतः काही सांगत नाही. ती साध्य होत असतील तर सांगण्याची काही गरजच नसते. अशा रीतीने, इतर लोकांना जगाविषयी काय वाटते हे कळून घेण्याचे आपले सर्वात उत्तम साधन म्हणजे कविता. आणि कविता वाचीत असता जीवन इतरांना कसे दिसते ह्यापेक्षा आपल्याला कसे जाणवते हेच अधिक कळून येते.

इथे विचारासाठी न घेतलेल्या विषयांचे वर्णन करण्यासाठी जे शब्द वापरावे लागतील त्यापेक्षा वेगळ्या शब्दांनी प्रस्तुतच्या दृष्टिकोणांचे वर्णन करता येणार नाही. तसेच सर्वसामान्य बौद्धिक पार्श्वभूमीवरून कवीच्या दृष्टिकोणासंबंधी अनुमान काढता येणार नाही हे खरे आहे. तरी देखील त्याची कविता वाचल्यानंतर आणि त्याच्या अनुभवाने आपल्या ठिकाणी आपला अनुभव जागृत केल्यानंतर, वळून आवतीभोवती पाहिले तर हे दृष्टिकोण शंभर वर्षांपूर्वीच्या किंवा हजार वर्षांपूर्वीच्या कवितेत आढळणाऱ्या दृष्टिकोणांपेक्षा, काही बाबतीत इतके वेगळे का हे आपल्याला कळू शकेल. असे केल्याने ते दृष्टिकोण कोणते हे निर्दिष्ट करण्याचे एक साधन आपल्या हाती लागते. आणि ते साधन जे जात्याच कविता वाचण्याला असमर्थ आहेत (अशांची संख्या वाढत चालली आहे) अशा लोकांना, आणि 'नवकवितेत आपल्याला काही कळत नाही.' असे म्हणून ती वाचण्याचे टाळणारे जे शिक्षणाचे बळी आहेत अशांना, उपयोगी पडणारे आहे.

तर मग बौद्धिक पार्श्वभूमीत आणि जगासंबंधीच्या चित्रात कोणत्या प्रकारच्या घडामोडी झाल्या आहेत ? आणि त्या क्षेत्रात झालेल्या बदलांमुळे आपल्या दृष्टिकोणांमध्ये कोणत्या प्रकारांनी पुनर्व्यवस्थापन घडून आले असणे शक्य आहे ?

मुख्य आणि महत्त्वाचा असा जो बदल घडून आला आहे त्याचे वर्णन 'निसर्गाचे अमानवीकरण'[१] (Neutralization of Nature) असे

[१] परिशिष्ट पाहा.

करता येईल. जगाकडे पाहण्याची यातुनिष्ठ (Magical View) दृष्टी जाऊन तिच्या जागी विज्ञाननिष्ठ दृष्टी आली आहे. हा बदल इतका मोठा आहे की, त्याची तुलना केवळ यातुनिष्ठ दृष्टी येण्यापूर्वी जगाकडे पाहण्याची जी कोणती दृष्टी असेल ती जाऊन तिच्या जागी यातुनिष्ठ दृष्टी आली तेव्हा झालेल्या बदलाशीच करता येईल. यातुनिष्ठ दृष्टी म्हणजे जी घडामोडींचे नियंत्रण करू शकतात, ज्यांना आवाहन करता येते, आणि मानवी कृत्यांनी ज्यांच्यावर काही अंशी नियंत्रण ठेवता येते अशा भुता-दैवतांच्या अस्तित्वावर विश्वास. [एखाद्या शक्तीचा] संचार (inspiration) आणि कर्मकाण्ड (ritual) ह्यांवरची श्रद्धा ही ह्या [यातुनिष्ठ] दृष्टीची द्योतक आहेत. गेल्या सुमारे तीनशे वर्षांपासून ह्या दृष्टीला धक्के बसत आहेत, पण गेल्या सुमारे सत्तर वर्षांत तिचा निःसंदिग्ध पराभव झाला आहे. आपल्या नित्याच्या व्यवहारांपैकी अनेकांवर ह्या दृष्टीच्या अवशेषांचा अजून प्रभाव आहे. पण कोणीही जाणता मनुष्य सहजपणे स्वीकार करील असा जगा-संबंधीचा दृष्टिकोण तो आता राहिलेला नाही. कविता आणि इतर कला ह्यांचा उगम ह्या यातुनिष्ठ दृष्टिकोणात आहे असे मानण्याला थोडाबहुत आधार आहे. ह्या दृष्टिकोणाबरोबरच कविताही नाहीशी होण्याची शक्यता आहे ही गोष्ट गंभीरपणे विचार करण्यासारखी आहे.

यातुनिष्ठ दृष्टीच्या पराभवाची कारणे सर्वांना माहिती आहेत. मानवाला निसर्गासंबंधी झालेल्या ज्ञानातील वाढ आणि त्याने निसर्गावर गाजवलेला प्रभाव (शेतीचा शोध) ह्यातून ती दृष्टी निर्माण झाली असावी असे दिसते. त्या ज्ञानाचा आणि त्या प्रभावाचा विस्तार ह्यातून तिचा पराभव झाला. इतका दीर्घ काळ (दहा हजार वर्षे?) तिचा प्रभाव टिकून राहिला ह्याचे कारण माणसाच्या दृष्टिकोणाचा विषय ह्या नात्याने तिच्या ठिकाणी पर्याप्तता होती आणि त्यामुळे त्याच्या भावनात्मक गरजा भागवण्याचे तिला सामर्थ्य प्राप्त झाले होते. मानवाचे दृष्टिकोण नेहमी समाज-गटांच्या परिघात विकास पावले आहेत हे आपण लक्षात ठेवले पाहिजे. त्याला काय वाटते हे त्यातून व्यक्त होते. आपल्या सहवासातल्या माणसांशी त्याचे जे वागणे असते त्याचा ते मूलस्त्रोत होत. मानुषेतर सृष्टीला ते सादृश्यामुळे लागू केले जातात. माणसाच्या अति निकटच्या

आणि महत्त्वाच्या व्यवहारांसारखेच निसर्गाचे व्यवहार आहेत असे समजणे म्हणजेच निसर्गासंबंधीची यातुनिष्ठ दृष्टी. म्हणूनच दुसऱ्या कोणत्याही दृष्टीपेक्षा ही दृष्टी मनुष्याच्या भावनांच्या घडणीला अधिक साजेशी आहे. ह्या दृष्टीमुळे त्याला निसर्गावर खरोखर जे वर्चस्व मिळवता आले त्याच्याशी त्याला तिच्याबद्दल वाटणाऱ्या आकर्षणाचा फारसा संबंध नव्हता. प्रार्थनेची परिणामकारकता प्रत्यक्ष प्रयोगाने तपासून पाहणारा गॅल्टन हा पहिला मनुष्य होता हे ह्याचे एक उदाहरण आहे. त्या दृष्टीला जी प्रतिष्ठा प्राप्त झाली तिचे कारण म्हणजे तिच्यातून दिसणाऱ्या विश्वाशी सहज आणि समाधानकारकपणे भावनात्मक संबंध ठेवता येत असे. माणसाचे प्रेम, द्वेष, भय, आशा, निराशा ह्यांच्या प्रकटनाला तिच्यात वाव असे. ह्या दृष्टीमुळे जीवनाला जो आकार, जी धार आणि जी सुसंगतता लाभली ती दुसऱ्या कोणत्याही साधनाने लाभली नसती.

त्या विश्वाच्या जागी आता जे विश्व आले आहे ते गणित्यांचे विश्व आहे. अधिकाधिक व्यापक आणि अधिकाधिक सामान्य (general) अशी समरूपे (uniformities) पाहण्याचे ते क्षेत्र आहे. त्यात अमर्याद प्रमाणावर बौद्धिक निश्चितता लाभण्यासारखी आहे. संशोधनाशी निगडित असलेली निराशा आणि भावनात्मक उत्साहितता ह्यांनाही ह्या विश्वात वाव – आणि तोही पूर्वी केव्हाही नव्हता इतक्या मोठ्या प्रमाणात – आहे. त्यामुळे, इतर कालखण्डात जे लोक कवी झाले असते ते कदाचित आज जीव-रसायनशास्त्राच्या प्रयोगशाळांत असतील. सध्या काव्याच्या क्षेत्रात जे दुर्भिक्ष आहे असे म्हटले जाते त्याचे समर्थन करण्यासाठी आपल्याला अवश्य तर ह्या वस्तुस्थितीचा उपयोग करता येईल. पण रोमहर्षक अशा काही गोष्टी सोडल्या तर प्रश्न असा आहे की, विज्ञानाने निर्माण केलेल्या ह्या विश्वचित्राचा माणसाच्या भावनांशी काय संबंध ? खुशीने अथवा नाखुशीने सापेक्षतावादाच्या सामान्य सिद्धांताच्या अधीन असलेला ईश्वर भावनांना आवाहन करू शकत नाही. तेव्हा अशा प्रकारची तडजोड उपयोगी पडण्यासारखी नाही. मि. वेल्स, प्रो. अलेक्झांडर आणि प्रो. लॉइड मॉर्गन ह्यांनी अनेक उद्गमनशील (emergent) देवतांची कल्पना पुढे मांडली आहे. पण

हाय! ही कल्पना पुढे मांडली जाण्याची कारणे इतकी उघड आणि स्पष्ट झालेली आहेत की, ती परिणाम करू शकत नाहीत. असलेली मागणी ती पुरवतात, मागणी निर्माण करीत नाहीत. ती आपला उद्देश सिद्धीला नेऊ शकत नाहीत.

थोडक्यात म्हणजे, विज्ञानाने घडवून आणलेली क्रान्ती इतकी मूलगामी आहे की, असल्या अर्धवट साधनांनी तिला तोंड देता येणार नाही. मानवी मनाची संघटना भूतकाळात ज्या मध्यवर्ती तत्त्वावर बुद्धिपुरस्सर करण्यात आली त्या तत्त्वाशी ह्या क्रान्तीचा संबंध पोचतो. जोपर्यंत ते मध्यवर्ती तत्त्व कायम राहील तोपर्यंत मानवी श्रद्धांत[१] कितीही बदल घडवून आणला तरी [मनाचे] संतुलन पुन्हा प्रस्थापित होऊ शकणार नाही. ह्या विधानांच्या मुख्य हेतूकडे मी आता वळतो.

मनुष्याला पहिल्यांदा जेव्हा 'मी' पणाची जाणीव झाली आणि तो विचारशील झाला तेव्हापासूनच तो असे समजत आला आहे की, आपल्या भावना, आपले दृष्टिकोण, आपले वर्तन ह्या सर्वांचा उद्‌गम आपल्या ज्ञानात आहे. शक्यतोवर ज्ञान[२] हा पाया धरून त्यावर भावना, दृष्टिकोण आणि वर्तन ह्यांची इमारत रचावी आणि अशा रीतीने आपल्या व्यक्तित्वाची घडण करावी हे शहाणपणाचे होईल असे त्याला वाटते. पण वस्तुस्थिती अशी आहे की, माणसाची घडण अशा रीतीने कधीच झाली नाही. कारण परवापरवापर्यंत ज्ञान हे अत्यंत दुर्मिळ होते. पण त्याची सतत अशी समजूत करून देण्यात आली आहे की, ह्याच रीतीने त्याची घडण झाली आहे आणि ह्याच मार्गाने त्याने ती पुढे चालू ठेवली आहे. एकदा ज्ञान प्राप्त झाले की, अस्तित्वासंबंधी योग्य दिग्दर्शन आपोआपच लाभेल. जग काय आहे ह्यासंबंधीचे ज्ञान लाभले की, त्या ज्ञानामुळे आपोआपच जगासंबंधी कोणती भावनात्मक वृत्ती बाळगावी, कोणते दृष्टिकोण स्वीकारावे, आणि कोणती ध्येये उराशी

[१] परिशिष्ट पाहा.

[२] म्हणजेच, संकुचित आणि काटेकोर अर्थाने, खऱ्या आणि प्रमाणसिद्ध अशा विचारांच्या आधारावर. 'सत्य' आणि 'ज्ञान' ह्या शब्दांच्या अर्थासंबंधीच्या चर्चेसाठी 'प्रिन्सिपल्स् ऑफ लिटररी क्रिटिसिझम्' प्रकरणे ३३ आणि ३४; 'मेन्शियस् ऑन द माइण्ड' प्रकरण ४; त्याचप्रमाणे 'द मीनिंग ऑफ मीनिंग' (C. K. Ogden च्या सहकार्याने ; Harcourt, Brace & World, Inc., 1923, 1959), प्रकरणे ७ आणि १० पाहा.

वाळगून जगावे हे कळेल, ह्या समजुतीने माणूस ज्ञान संपादन करीत राहिला. ही साधना करून जे काही त्याला लाभले त्याला तो सतत 'ज्ञान' म्हणत राहिला. ते प्राय: 'शुद्ध' ज्ञान नव्हते ह्याचे त्याला भान नव्हते. त्याचप्रमाणे त्याच्या भावना, दृष्टिकोण आणि वर्तन ह्यांना त्याच्या शारीरिक आणि सामाजिक गरजांनी आधीच वळण लावलेले होते आणि आपल्याला जे काही ज्ञान मिळाले आहे असे त्याला वाटत होते त्याचेही उगमस्थान त्याच्या पूर्वनियंत्रित भावना, दृष्टिकोण आणि वर्तन हीच होती ह्याचीही त्याला जाणीव नव्हती.

काही काळापूर्वी त्याला एकाएकी मोठ्या प्रमाणावर खरेखुरे ज्ञान मिळू लागले. खरेखुरे म्हणजे त्याच्या इच्छा आणि भीती ह्यांच्या प्रभावापासून अलिप्त असे ज्ञान. ही प्रक्रिया वाढत्या झपाट्याने चालत राहिली आणि त्याच्या ज्ञानात भराभर भर पडत गेली. आता त्याच्यापुढे अशी वस्तुस्थिती उभी राहिली आहे की, ज्या तथाकथित ज्ञानाच्या आधारावर त्याने आपल्या दृष्टिकोणांचा इमला उभा केला होता तो आधारच कोलमडला आहे. त्याबरोबरच त्याला हेही मान्य करावे लागत आहे की शुद्ध ज्ञानाचा त्याच्या ध्येयांशी काही संबंध नाही; तसेच त्याला काय वाटावे किंवा त्याने काय करण्याचा प्रयत्न करावा ह्याच्याशीही त्याचा साक्षात संबंध नाही.

आणि ह्याचे कारण असे की, पद्धतशीरपणे वस्तुनिर्देश करणारे आपले प्रकृष्ट (elaborate) साधन असे जे विज्ञान ते कोणत्याही अंतिम अर्थाने वस्तुजाताचे स्वरूप काय आहे ते सांगत नाही, आणि सांगू शकत नाही. 'अमुक म्हणजे काय?' ह्या स्वरूपाच्या प्रश्नाचे उत्तर ते कधीही देऊ शकणार नाही. अमुक-अमुक वागते कसे एवढेच ते सांगू शकेल. ह्याहून अधिक करण्याचा त्याचा प्रयत्नही नाही. आणि खरे म्हणजे ह्याहून अधिक काही करणे शक्यही नाही. 'काय?' आणि 'का?' ह्या स्वरूपाचे, प्राचीन आणि खोलवर जाऊन त्रस्त करणारे–'कसे?' चे विरोधी असे–जे प्रश्न आहेत त्यांची बारकाईने परीक्षा केली तर असे दिसून येते की, ते मुळी प्रश्न नाहीतच. तर भावनांचे समाधान करण्यासाठी केलेल्या त्या विनंत्या आहेत.

आश्वासन[१] मिळवण्याच्या आपल्या इच्छेच्या त्या निदर्शक आहेत. विज्ञानाच्या साहाय्याने प्राप्त होणारे निर्विकार आणि भावनारहित ज्ञान मिळवण्याच्या इच्छेच्या निदर्शक नाहीत. प्रश्न आणि विनंत्या, ज्ञान आणि इच्छा, ह्यांच्यासंबंधीच्या 'कसे?' चा आपण बारकाईने, विचार केला तर ही गोष्ट स्पष्ट होते. ह्या विश्वात मानवाचे स्थान काय आहे आणि त्याचे भवितव्य काय हे विज्ञान सांगू शकेल. आणि ते सांगणे असे आहे : मानवाचे स्थान संकटग्रस्त आणि भवितव्य अनिश्चित आहे. आपण विज्ञानाचा शहाणपणाने उपयोग केला तर आपल्याला पुष्कळ काही करता येण्यासारखे आहे. पण आपण कोण आहो आणि हे जग काय आहे हे त्याला सांगता येणार नाही. म्हणजे हे प्रश्न न सुटणारे आहेत म्हणून नाही. तर हे प्रश्न मुळी वैज्ञानिक स्वरूपाचे प्रश्नच नाहीत म्हणून. अशा व्याज-प्रश्नांचे उत्तर विज्ञान देऊ शकत नाही. ते त्याच्या क्षेत्रातले प्रश्न नाहीत, वैज्ञानिक प्रश्नांना विज्ञानाकडून ज्या अर्थाने 'उत्तर' मिळावे अशी अपेक्षा आपल्या ठिकाणी निर्माण झाली आहे त्या अर्थाने तत्वज्ञान किंवा धर्म ह्यांच्याकडून देखील ह्या प्रश्नांना 'उत्तर' मिळू शकणार नाही. 'प्रश्न' ह्या शब्दाचे अर्थ जसे बदलत जातात, तसे 'उत्तर' ह्या शब्दाचेही बदलत जातात. तसेच 'वास्तव', 'सत्य', 'श्रद्धा' आणि 'ज्ञान' ह्यांचेही बदलत जातात. शोध घेण्याच्या इतर पद्धतींपासून विज्ञानाची पद्धत विभक्त झाल्यामुळे त्याला जी एक नवी प्रतिष्ठा आणि सामर्थ्य प्राप्त झाले आहे, त्यामुळे हे 'अर्थ' बदलत चालले आहेत आणि त्यांच्यामधल्या भेदांची आपल्या ठिकाणी अधिक व्यापक जाणीव अपरिहार्यपणे निर्माण होऊ लागली आहे. आणि त्याबरोबरच जी नाना प्रकारची 'उत्तरे' प्राचीन काळापासून सुजाणपणाच्या किल्ल्या मानली गेली आहेत, ती आता अनेकांच्या मते निरर्थक ठरण्याच्या मार्गावर आहेत.

त्यामुळे एक प्रकारे जीवशास्त्रीय क्रान्तिप्रसंगच निर्माण झाला आहे आणि त्यातून विनायास मार्ग निघण्याची शक्यता नाही. काही अंशी विचार करून आणि काही अंशी नव्या पद्धतीने आपल्या मतांची घडण करून कदाचित आपल्याला ह्यातून मार्ग काढता येईल. तसे जर झाले

---

[१] J. Piaget ह्यांच्या 'द लँग्वेज अँण्ड थॉट ऑफ द चाइल्ड' (Humanities Press, Inc., third edition, 1959) ह्या ग्रंथात मुलांच्या प्रश्नांसंबंधी जी चर्चा आली आहे ती ह्या संदर्भात उद्बोधक आहे.

नाही तर जो आपण निवडणार नाही असा एखादा मार्ग आपल्यावर लादला जाईल. पण तो प्रसंग आहे तोवर त्याचा प्रत्येक व्यक्तीवर आणि समाजावर ताण पडत आहे. आधुनिक काळात जाणवणाऱ्या अनेक अडचणींचे काही अंशी हे स्पष्टीकरण आहे, आणि आपल्या प्रस्तुत विषयाकडे परत यायचे तर कवीला ह्या अडचणी विशेषच जाणवत आहेत. खरे म्हणजे मी काही आपल्या विषयापासून फार लांब गेलो नाही.




## ६. काव्य आणि श्रद्धा

Control of the passes was, he saw, the Key
To this new district, but who would get it ?
He, the trained spy, had walked into the trap
For a bogus guide, seduced with the old tricks.

W. H. AUDEN.

अनुभवशरीरात व्यवस्था आणि सुसंगती निर्माण करणे, त्यांद्वारा त्याला स्वातंत्र्य प्राप्त करून देणे हे कवीचे कार्य आहे हे आपण पाहिले. हे कार्य तो शब्दांच्या साहाय्याने करतो. शब्द हे अनुभवशरीराच्या सांगाड्यासारखे असतात. अनुभव ज्या प्रेरणांचा बनलेला असतो त्या, ह्या सांगाड्यामुळे, एकमेकींशी व्यवस्थित जोडल्या जातात आणि एकत्रितपणे कार्य करतात. शब्दांच्या द्वारा हे कार्य नानाविध प्रकारांनी होते. त्यांचा मागोवा घेण्याचे काम तत्त्वज्ञानाचे गोंधळलेले नवे अपत्य जे भाषाशास्त्रीय मनोविज्ञान (Linguistic Psychology) त्याचे आहे. जे थोडेबहुत करणे शक्य आहे त्यावरून असे दिसून आले आहे की, समीक्षेसंबंधीची पूर्वीची बहुतेक तत्त्वे एक तर खोटी तरी आहेत किंवा अर्थहीन तरी आहेत. अल्पज्ञान हे ह्या बाबतीत भयावह नाही. उलट त्यामुळे वातावरण चांगलेच निवळले आहे.

सध्या उपलब्ध असलेल्या ज्ञानाच्या अंधुक प्रकाशातसुद्धा आपण— स्थूलमानाने आणि अपर्याप्तपणे—एवढे सांगू शकतो की, कवितेमध्ये शब्द मुख्यत: दोन प्रकारांनी कार्य करीत असतात. एक इंद्रियांचे चेतक

म्हणून आणि दुसरे (अगदी व्यापक अर्थाने) प्रतीके म्हणून. शब्दांचे इंद्रियसंबंधी कार्य दुसऱ्या कार्यापासून यत्किंचितही स्वतंत्र नसते आणि बहुतेक कवितांत काही खास कारणांमुळे त्याला पूर्ववर्ती महत्त्व असते एवढेच सांगून त्यासंबंधीचा विचार आपण बाजूला ठेवू. कवितेमधले शब्दांचे जे दुसरे कार्य त्याचाच विचार आपण करू. त्यात देखील दुय्यम महत्त्वाचा बराचसा भाग वगळून एकाच स्वरूपाच्या कार्याचा विचार करू. त्या कार्याला मी व्याज-विधान (pseudo-statement) असे म्हणतो.

अंतिमत: ज्याची सत्यता प्रयोगशाळेतल्याप्रमाणे पडताळून पाहता येते असे विधान म्हणजे वैज्ञानिक विधान, आणि जिथे 'सत्यता' ह्याचा अर्थ मूलत: एखाद्या दृष्टिकोणानुसार स्वीकार्यता, आणि दूरान्वयाने त्या दृष्टिकोणाचीच स्वीकार्यता, असा असतो तो भावनात्मक उद्‌गार. ह्या दोन जातींच्या विधानामधला फरक जे जाणतात ते हे कबूल करतील की, वैज्ञानिक विधाने करणे हे कवीचे काम नाही. परंतु कवितेत सतत अशी विधाने आणि महत्त्वाची विधाने केली गेल्यासारखे दिसते. काही गणित्यांना कविता वाचणे शक्य होत नाही ह्याचे हे एक कारण आहे. ती जी विधाने म्हणून केल्यासारखी दिसतात ती त्यांना खोटी वाटतात. कवितेकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण आणि कवितेपासून ते करीत असलेल्या अपेक्षा ही चुकीची आहेत हे मान्य होईल. पण कवितेकडे पाहण्याचा दुसरा, योग्य – काव्यात्म – दृष्टिकोण नक्की कोणता आणि गणिती दृष्टिकोणापासून तो कशा प्रकारे वेगळा आहे ?

असे दिसते की, काव्यात्म दृष्टिकोणामुळे व्याज-विधानाच्या संभाव्य परिणामांच्या क्षेत्राला मर्यादा पडते. वैज्ञानिक दृष्टिकोणाच्या बाबतीत हे क्षेत्र अमर्याद आहे. कोणताही परिणाम आणि प्रत्येक परिणाम तिथे प्रस्तुत (relevant) असतो. एखाद्या विधानापासून निघणारा परिणाम मान्य अशा वस्तुस्थितीशी विरोधी असेल तर ते विधान त्या प्रमाणात अग्राह्य ठरेल. व्याज-विधानाकडे काव्यात्म दृष्टिकोणातून पाहिले तर असे होत नाही. प्रश्न असा आहे की, ही जी मर्यादा पडते ती कशा प्रकारे कार्य करते ? ह्याचे मनाला मोह पाडणारे एक उत्तर म्हणजे कवीला व त्याच्या वाचकांना मान्य असलेले, कल्पनेने निर्माण केलेले, व लुटुपुटीचे

असे एक विश्व मानणे. ह्या कल्पित विश्व-व्यवस्थेशी जुळणारे जे व्याज-विधान असेल ते 'काव्यदृष्टचा सत्य' (poetically true) मानले जाईल. जे तसे नसेल ते 'काव्यदृष्टचा असत्य' (poetically false) मानले जाईल. सर्वसामान्य 'सुसंगतिसिद्धान्तां' ( coherence theories ) चा नमुना पुढे ठेवून 'काव्यात्म सत्याची' ( poetic truth ) व्यवस्था लावण्याचा हा प्रयत्न तर्कशास्त्राच्या काही संप्रदायांनुसार स्वाभाविक आहे. पण तो अपर्याप्त आहे आणि मुळापासूनच चुकीच्या मार्गाने गेला आहे. त्याच्याविरुद्ध येऊ शकणाऱ्या आक्षेपांपैकी दोहोंचाच उल्लेख करू. हे 'कल्पित विश्व' कोणते हे कोणत्याही विशिष्ट प्रसंगी शोधून काढण्याचे काही साधन नाही. आणि ते विश्व कोणते ते शोधून काढणे शक्य आहे असे समजले तरी त्याच्या चतुःसीमेत जी सुसंगती असायला हवी ती तार्किक नात्यांनी बांधलेली नसेल. "O Rose, thou art sick!" हे विधान जर 'काव्यदृष्टचा सत्य' ठरायला हवे असेल तर ते कोणत्या विधान-व्यूहात बसवावे लागेल आणि त्या व्यूहातील विधानात कोणते तार्किक परस्परसंबंध असावे लागतील हे निश्चित करण्याचा प्रयत्न करा म्हणजे ह्या सिद्धांताचा फोलपणा दिसून येईल.

आपल्याला आणखी पुढे गेले पाहिजे. काव्यात्म दृष्टिकोणापासून सुसंगतपणे निघणारे परिणाम हे तर्कनिष्ठ नसतात. तसेच तर्क अंशतः शिथिल करून लाभणारेही नसतात. क्वचित प्रसंगी—आणि तोही योगायोगाने—तर्क आला तरी तर्काचा त्यांच्याशी काहीही संबंध नसतो. आपल्या भावनांच्या व्यवस्थापनातून ते परिणाम निष्पन्न होतात. व्याज-विधानाला जी स्वीकार्यता प्राप्त होते ती त्या विधानाचे आपल्या भावनांवर आणि दृष्टिकोणांवर जे परिणाम होतात त्यांवर पूर्णपणे अवलंबून असते. तर्काचा तिथे संबंध आलाच तर आपल्या भावनात्मक प्रतिसादाच्या अधीन म्हणून, त्याचा सेवक म्हणून येतो. मात्र तो एक अनावर सेवक आहे हा कवीचा आणि वाचकांचा नेहमीचा अनुभव आहे. व्याज-विधान जर एखाद्या दृष्टिकोणाशी जुळते असेल किंवा त्याला पोषक असेल, किंवा इतर कारणांसाठी इष्ट अशा दृष्टिकोणांना एकत्र जोडीत असेल तर ते व्याज-विधान 'सत्य' म्हणावे लागेल. पण ही 'सत्यता'

वैज्ञानिक 'सत्यते' च्या इतकी विरुद्ध आहे की, त्या दोहोंसाठी एकच शब्द वापरावा लागणे हे खेदाचे आहे. पण तूर्त तरी हा दुरुपयोग टाळणे कठीण आहे.[१]

काव्यात येणारी व्याज-विधाने आणि विज्ञानात येणारी विधाने ह्यांतील मूलभूत विसंगती आणि विरोध लक्षात येण्याला हे थोडक्यात केलेले विश्लेषण पुरेसे ठरेल असे वाटते. व्याज-विधान ही एक शब्द-संहती आहे. आपल्या प्रेरणा आणि वृत्ती (attitudes) मुक्त करणे किंवा त्यांचे संघटन करणे हा त्याचा परिणाम आहे आणि तेच संपूर्णपणे त्याच्या अस्तित्वाचे समर्थन आहे. (अर्थात ह्या संघटना त्यांच्या-त्यांच्यात अधिक चांगल्या होतात की अधिक वाईट ह्यावर लक्ष पाहिजेच.) उलटपक्षी वैज्ञानिक विधानाचे समर्थन त्याच्या सत्यतेत आहे. म्हणजे ज्या वस्तुस्थितीचा ते निर्देश करते तिच्याशी अगदी काटेकोर अर्थाने सुसंगत असण्यात आहे.

खरी आणि खोटी अशी दोन्ही प्रकारची विधाने अर्थातच सतत वृत्ती आणि कृती ह्यांना प्रेरणा देत असतात. आपले नित्याचे व्यावहारिक जीवन बव्हंशी त्यांच्याच मार्गदर्शनाने चाललेले असते. एकंदरीने पाहता खोट्या विधानांपेक्षा खरी विधाने आपल्या अधिक उपयोगी पडतात. असे असले तरी आपल्या भावनांचे आणि वृत्तींचे व्यवस्थापन आपण केवळ खऱ्या विधानांच्या आधारावर करीत नाही आणि आजच्या काळात करू शकणार नाही किंवा ह्यापुढे कधी आपल्याला करता येईल असाही संभव दिसत नाही. आपल्या संस्कृतीवर जी मोठी नवी संकटे आली आहेत त्यांपैकी एक हे आहे. ईश्वरासंबंधीची, विश्वासंबंधीची, मानवप्रकृतीसंबंधीची, मना-मनांच्या परस्पर संबंधाविषयीची, आत्म्यासंबंधीची, त्याचे स्थान आणि अंतिम भवितव्य ह्यांच्यासंबंधीची, मनाच्या संघटनेत केन्द्रस्थानी असलेली, त्याच्या स्वास्थ्याला अत्यंत आवश्यक असलेली असंख्य व्याज-विधाने आज

[१] व्याज-विधान हे कोणत्याही अर्थाने खोटे असतेच असा माझा तो शब्द वापरण्यात आशय नाही. ते एक अशा प्रकारचे 'विधान' आहे की त्याच्या वैज्ञानिक खरेपणाचा किंवा खोटेपणाचा प्रस्तुत उद्दिष्टाशी काही संबंध नसतो.

ह्या परिच्छेदात 'तर्क' हा शब्द मर्यादित आणि पारंपरिक किंवा सर्वसामान्य अर्थाने वापरला आहे.

कळकळीच्या, प्रामाणिक आणि बहुश्रुत माणसांच्या बाबतीत, एकाएकी, शतकानुशतके त्यांवर ज्या प्रकारची श्रद्धा ठेवली गेली होती त्या प्रकारची श्रद्धा ठेवणे अशक्य व्हावे अशी झाली आहेत.[१] श्रद्धा ठेवण्याच्या पद्धतीचे परिचित प्रकार परत पूर्वीसारखे होऊ शकणार नाहीत इतके बदलून गेले आहेत. आणि ज्या ज्ञानाने त्यांना स्थानभ्रष्ट केले आहे ते अशा प्रकारचे ज्ञान नाही की, त्याच्यावर मनाची तितकीच उत्कृष्ट संघटना उभी करता येईल

ही सध्याची परिस्थिती आहे. आपल्याला पर्याप्त (adequate) असे ज्ञान मिळेल असा संभव नाही. वैज्ञानिक स्वरूपाचे ज्ञान आपली गरज भागवू शकत नाही हे स्पष्ट आहे. अशा परिस्थितीत उपाय एकच आहे आणि तो म्हणजे प्रत्ययसिद्ध विधानांना उचित अशा प्रकारच्या श्रद्धेपासून आपली व्याज-विधाने तोडून मुक्त करणे. असे केल्यानंतर अर्थातच ती बदलतील. तरी देखील आपल्या दृष्टिकोणांचा परस्परांशी आणि जगाशी संबंध जोडण्याचे ती मुख्य साधन राहतीलच. हा निर्वाणीचा किंवा अगतिकतेतून निघालेला उपाय नाही. कारण वास्तवनिष्ठ

---

[१] परिशिष्ट पाहा. मी इथे ज्या प्रकारच्या 'मना' चा विचार करतो आहे त्याच्या दृष्टीने 'माझी "क्ष" वर श्रद्धा आहे काय?' हा प्रश्न पूर्वीचा राहिला नाही. विज्ञानाच्या विलगीकरणामुळे (segregation) आणि त्यांतील सिद्धांतनतंत्रांच्या विशुद्धीकरणामुळे ज्याच्यावर श्रद्धा ठेवायची 'ते' च बदलले आहे असे नाही तर श्रद्धा ठेवण्याची पद्धतीही बदलली आहे. हेच संकट आहे. आणि त्यावर जो उपाय सुचवला गेला आहे तो म्हणजे श्रद्धा ठेवण्याच्या 'पद्धती-पद्धतीं' मध्ये आणखी फरक करणे. हे फरक म्हणजे 'अस्ति' (is so) आणि 'सत्ता' (being) ह्यांच्या अर्थांमधल्या फरकांना समांतर असे फरक. 'अस्ति' आणि 'सत्ता' ह्या शब्दांनीं सामान्यतः श्रद्धांचे अस्तित्व व्यक्त केले जाते. ह्या दोन ठिकाणी श्रद्धांच्या अर्थांमध्ये जे फरक आहेत त्यांच्याशी समांतर असे फरक आपण केले पाहिजेत. हे आपण मान्य केले म्हणजे जे जग 'आहे' ते तथाकथित 'सत्यतेच्या प्रमाणाच्या' बाबतीत ज्यांचे एकमेकांशी मोजमाप करणे शक्य नाही अशा अनेक जगात विभक्त होते. तरी पण महत्त्वाची गोष्ट अशी की, ह्या जगांची परस्परांच्या संबंधात एक व्यवस्था असते आणि ती व्यवस्था मनोनिर्मित असते. आणि त्यांच्यात परस्पर विक्षेप निर्माण झाला तर मानसिक स्वास्थ्य धोक्यात येते.

[वरील तळटीपेवर भाषांतरकाराची टीप :—

वरील तळटीपेतील 'अस्ति' म्हणजे ज्याचे असणे वैज्ञानिक पद्धतीने पडताळून पाहता येते ते, आणि 'सत्ता' म्हणजे जे वैज्ञानिक पद्धतीने पडताळून पाहता येत नाही–म्हणजे ज्याला विज्ञानात प्रामाण्य नाही–पण [ज्याला] माणसाच्या अनुभवविश्वात प्रामाण्य आहे ते.]

किंवा पडताळून पाहता येतील अशा [विज्ञाननिष्ठ] श्रद्धांचा काहीही संबंध नसतानासुद्धा अतियश महत्त्वाचे असे आपले दृष्टिकोण निर्माण होऊ शकतात आणि टिकू शकतात हे काव्याने निःसंदिग्धपणे दाखवून दिले आहे. 'किंग लियर' वाचायचे असेल तर अशा [विज्ञाननिष्ठ] श्रद्धा असण्याची काही आवश्यकता नाही. किंबहुना अशा श्रद्धा असता उपयोगी नाही. अशा श्रद्धेशी ज्यांचा आपण काहीही संबंध जोडीत नाही अशी व्याज-विधाने आणि खऱ्या अर्थाने ज्यांना विधाने म्हणता येते ती म्हणजे विज्ञाननिष्ठ विधाने ह्यांच्यात परस्पर विरोध असू शकत नाही. आपण जेव्हा काव्यामध्ये अयोग्य अशा प्रकारच्या श्रद्धा घुसवतो तेव्हाच धोका उत्पन्न होतो. ह्या दृष्टीने पाहता असे करणे हे काव्याची अप्रतिष्ठा करण्यासारखे आहे.

परंतु अतिप्राचीन काळापासून आजपर्यंत अत्यंत बुद्धिमान माणसांना ज्याने आकर्षित केले आहे असा एक महत्त्वाचा काव्यसमीक्षासंप्रदाय आहे. त्यात लोकांना असे पटवण्याचा प्रयत्न केला गेला आहे [आणि जात आहे] की, विज्ञान आणि काव्य ह्यांचे कार्य एकच आहे, किंवा त्यांपैकी एक दुसऱ्याचे अधिक 'उन्नत रूप' आहे, किंवा त्या दोहोंत परस्पर विरोध आहे आणि त्यांपैकी कोणत्या तरी एकाचीच आपण निवड केली पाहिजे.

सतत चालत आलेल्या ह्या प्रयत्नाचे मूळ अजून दाखवून द्यायचे आहे. जे यातुनिष्ठ दृष्टीचे मूळ तेच ह्याचेही. जी मान्यता न्यायतः फक्त प्रत्ययसिद्ध अशा वैज्ञानिक विधानांना आणि ज्यांपासून विज्ञान निष्पन्न होते अशा नित्याच्या अवलोकनविषयक आणि कृतिविषयक विधानांना मिळायला हवी तशी निरपवाद मान्यता जर आपण एखाद्या व्याज-विधानाला दिली, किंवा देता येईल असे केले, तर ज्या प्रेरणा आणि दृष्टिकोण ह्यांच्यासह आपण त्याला प्रतिसाद देतो त्यांना विलक्षण स्थिरता आणि जोम लाभतात. थोडक्यात म्हणजे, जर आपण कवितेवर अशी [निरपवाद] श्रद्धा ठेवू शकलो तर – आपली श्रद्धा असेल त्या अवधीत – जगाचा कायापालट झाल्यासारखा वाटेल. अशी श्रद्धा ठेवणे आताच्या मानाने पूर्वीच्या काळी अधिक सोपे होते आणि ती सवय दृढमूल होऊन बसली आहे. विज्ञानाच्या विस्तारामुळे आणि निसर्गाच्या अमानवीकरणामुळे अशी श्रद्धा ठेवणे कठीण त्याचप्रमाणे धोक्याचे झाले आहे.

पण त्या वृत्तीचे आकर्षण अजून टिकून आहे. मादक द्रव्यांच्या सेवनाशी ह्या गोष्टीचे अनेक प्रकारांनी साम्य आहे. म्हणूनच समीक्षकांचे वर उल्लेखिलेले प्रयत्न चालले आहेत. त्यासाठी बऱ्याच युक्त्यांचा अवलंब करण्यात आला आहे. काव्यात्म सत्य हे अलंकारात्मक, प्रतीकात्मक असते; किंवा ते 'झटिति-प्रत्ययात्म' म्हणजे सामान्य ज्ञानाच्या पलीकडचे साक्षात्काररूप असते; किंवा विज्ञानामुळे जे सत्य प्रत्ययाला येते तेच पण त्यापेक्षा अधिक उन्नत सत्य असते इत्यादी. विज्ञानाच्या निषेधासाठी किंवा विज्ञानाची चूक सुधारण्यासाठी काव्याचा वापर करण्याचे हे प्रयत्न सार्वत्रिक आहेत. ह्या सर्वांविरुद्ध एक मुद्दा आणण्यासारखा आहे. तो हा की, त्यांचे सविस्तर विवेचन कधीही करण्यात आलेले नाही. त्यापैकी कोणत्याही प्रयत्नावर भाष्य करणारा मिलच्या 'लॉजिक' सारखा प्रयत्न झालेला नाही. ज्या भाषेत ती मते मांडली जातात ती भाषा म्हणजे कालबाह्य मनोविज्ञान आणि भावनात्मक उद्‌गार ह्यांचे मिश्रण असते.

ज्या अमान्य करता येत नाहीत अशा वास्तव घटनांना ज्या प्रकारची मान्यता आपण देतो त्या प्रकारची मान्यता, भावनात्मक उद्‌गारांना– मग ती साधी निरवयव व्याज-विधाने असोत किंवा ज्यात आलंकारिकपणे काही तरी सांगितले आहे असे मानले जाते अशा अधिक शिथिल आणि अधिक मोठ्या रचना असोत – देण्याच्या दीर्घकाळ दृढ झालेल्या आणि खूप उत्तेजन दिल्या गेलेल्या सवयीमुळे बहुतेक लोकांचे बरेचसे प्रतिसादक्षेत्र दुर्बल झाले आहे. जे थोडेसे वैज्ञानिक तरुण वयातच विज्ञानाकडे वळले आणि प्रयोगशाळेत वाढले ते ह्या सवयीपासून अलिप्त आहेत. पण ते सामान्यतः कवितेकडे गंभीरपणे लक्षच देत नाहीत. बहुतेकांच्या बाबतीत ह्या सवयीचा परिणाम असा होतो की, निसर्गाचे अमानवी स्वरूप लक्षात आल्यामुळे ते कवितेपासून दुरावतात. आपले [काव्यासंबंधीचे] प्रतिसाद श्रद्धांच्या – मग त्या कितीही संदिग्ध असोत – आधारावर उभे करण्याची त्यांना इतकी सवय झालेली असते की, हे खोटे आधार काढून घेतले गेल्यावर ते [कवितेला] प्रतिसाद देण्याला असमर्थ ठरतात. अनेक गोष्टींसंबंधीचे त्यांचे प्रतिसाद पूर्वीपासून वळेच निर्माण केले गेलेले असतात. त्यांना अतिरिक्त उत्तेजन मिळालेले असते आणि मग

[पूर्वीचे] विश्वचित्र जेव्हा साहाय्य करीनासे होते तेव्हा कोलमडायची वेळ येते. स्वाभाविक भावनात्मक प्रतिसादाच्या अनेक क्षेत्रांत आज आपली स्थिती आधाराच्या काठ्या काढून घेतलेल्या डेलियाच्या ताटव्यासारखी झाली आहे. निसर्गाच्या अमानवीकरणाचा हा परिणाम कदाचित त्याच्या प्रारंभावस्थेतच असेल. त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट अशी आहे की, मनुष्यप्रकृती विलक्षण लवचीक आहे. प्रेमकविता मनोविश्लेषणावर मात करताना दिसत आहे.

भकासपणा, अनिश्चितता, निष्फलता, आकांक्षांचा निराधारपणा, प्रयत्नांची व्यर्थता, ह्यांची जाणीव, आणि जे एकाएकी लुप्त झाल्यासारखे दिसत आहे त्या जीवनदायक पाण्याची तहान, ही दोन्ही आपल्या जीवनाच्या आवश्यक त्या पुनर्घटनेची आपल्याला जाणवलेली चिन्हे होत.[1] आपले दृष्टिकोण आणि आपल्या प्रेरणा ह्यांना स्वावलंबी होण्याला भाग पाडले जात आहे. त्यांना आपल्या अस्तित्वासाठी जीवशास्त्रीय समर्थनाकडेच मागे लोटले जात आहे. आणि पुन्हा त्यांना स्वयंसंपूर्ण करण्यात येत आहे आणि ज्या थोड्या प्रेरणा सतत

---

[1] ह्या बाबतीत 'द वेस्ट लॅण्ड'चे माझ्यावर जे ऋण आहे ते येथें जाणवेल. मुळातल्या तळटीपेमुळे मि. एलिएटचा आणि इतर काही वाचकांचा गोंधळ झाल्यासारखा दिसतो. अगदी शक्य आहे! पण मी जेव्हा असे म्हटले की, "आपली कविता आणि सर्व प्रकारच्या श्रद्धा ह्यांत त्यांनी संपूर्ण फारकत घडवून आणली आहे," तेव्हा मी कवीच्या खाजगी चरित्रासंबंधी बोलत नव्हतो तर कवितेच्या तांत्रिक विलगीकरणाबद्दल (detachment) बोलत होतो. "जी गोष्ट चर्चेच्या क्षेत्रातच शक्य होऊन राहिली असती" ती त्यांनी प्रत्यक्ष अंमलात कशी आणली ह्याचा विचार करताना मला असे दिसले की, अव्यवस्थेसंबंधी चिंतन आणि तिची अभिव्यक्ती ह्यांच्यातूनच त्यांना नवी व्यवस्था आढळली. "खरंच! ही भयानक गोष्ट फार चमत्कारिक आहे. एखादा मनुष्य समुद्रात पडावा तसा जन्माला आलेला मनुष्य एका स्वप्नात पडतो. अननुभवी माणसे करतात तसा त्याने चढून वर हवेत येण्याचा प्रयत्न केला तर तो बुडतो, नाही का? तर तसे नाही, मी सांगतो काय ते! त्याला उपाय असा आहे की, त्या विनाशकारी महाभूताला शरण जायचे आणि पाण्यात आपले हातपाय चालवून त्या खोल, खोल, समुद्राला आपल्याला वर ठेवायला भाग पाडायचे. म्हणून तुम्ही जर मला विचाराल की, 'काय करायचे?' [तर मी म्हणेन] त्या विनाशकारी महाभूतांत खोल बुडी मारा...तोच मार्ग आहे." ('लॉर्ड जिम' पृ. २१६.) मि. एलियटच्या पुढल्या पुढल्या कवितांत 'अज्ञात अथांगाची भीती' काही वेळा आणखीही कमी दिसून येते. 'द वेस्ट लॅण्ड' मधल्या उत्कृष्ट भागांपेक्षाही 'अॅश वेन्सडे' ही अधिक चांगली कविता आहे ह्याचे, निदान काही अंशी तरी, मला उमजलेले स्पष्टीकरण वर दिले आहे.

सारख्याच जोमाने टिकून राहण्याइतक्या शक्तिशाली असलेल्या दिसतात त्या इतक्या ढोबळ आहेत की, अधिक तरलपणे विकसित झालेल्या माणसांना त्या जोपासण्यायोग्य वाटत नाहीत. अशी माणसे ऊब, अन्न, संघर्ष, मद्यपान आणि रतिसुख एवढ्यावरच जगू शकत नाहीत. अलीकडल्या बदलांचा ज्यांच्यावर सगळ्यात कमी परिणाम झाला आहे ते लोक पशुतुल्य जीवनापासून फार लांब न गेलेले असे आहेत. एखादा चांगल्या योग्यतेचा कवीसुद्धा आदिम मनोवस्थेकडे पुन्हा वळून [सध्याच्या कोंडीतून] मुक्तता मिळवण्याचा प्रयत्न करण्याची शक्यता आहे हे आपल्याला ह्या निबंधाच्या शेवटी दिसेलच.

रोगाचे बरोबर निदान करून दोष नेमका कुठे आहे हे दाखवणे महत्त्वाचे आहे. बहुधा विज्ञानातील एखाद्या तथाकथित 'जडवादा' वर ह्या बाबतीत दोषारोप केला जातो. ही चूक काही अंशी सदोष अशा विचारसरणीमुळे होते. पण यातुनिष्ठ दृष्टीचे अवशेष हे तिचे मुख्य कारण आहे. कारण हे विश्व जरी संपूर्णपणे 'चेतन' (spiritual) असते तरी ते मानवी दृष्टिकोणांशी अधिक जुळणारे असते असे नाही. ("सर्व जग 'चेतन' असणे" ह्या म्हणण्याचा अर्थ काय असेल तो असो, अशी सर्व विधाने प्रायः अर्थहीन असतात). विश्वासंबंधीचे प्रत्यय-सिद्ध ज्ञान आपले भावनात्मक प्रतिसाद चेतवण्याला असमर्थ आहे ह्याचे कारण विश्व अमुक द्रव्याचे बनले आहे हे नाही, तर त्याचा व्यवहार अमुक प्रकारे होतो, ते अमुक नियमांनुसार चालते हे आहे. आणि त्या ज्ञानाचे स्वरूपच त्याला अपर्याप्त करते. त्या ज्ञानाच्या द्वारा आपला वस्तुजातीशी जो संबंध येतो तो इतका तुटपुंजा आणि अप्रत्यक्ष स्वरूपाचा असतो की, त्याचा आपल्याला [दृष्टिकोणांच्या संदर्भात] काही उपयोग होऊ शकत नाही. ज्ञानव्यापारामध्ये मन आणि ज्ञानाचा[१] विषय ह्यांना एकत्र आणणारा जो बंध असतो त्यासंबंधी आपल्याला इतके ज्ञान होऊ लागले आहे की, परिपूर्ण जीवनाची हमी देणाऱ्या परिपूर्ण ज्ञानासंबंधीच्या स्वप्नाचे

[१] अर्थातच ज्याचा पडताळा पाहता येतो असे वैज्ञानिक स्वरूपाचे ज्ञान. 'ज्ञान' ह्या शब्दाचा अर्थ बदलून त्यात आशा, इच्छा, भीती आणि विचार (Reference) यांचाही समावेश केला तर मी जे म्हणतो आहे ते खरे राहणार नाही. पण मग 'खरे' ह्या शब्दाचाही प्रस्तुत अर्थ बदललेला असेल. पडताळून पाहता येण्याजोगे असणे ही मग त्याची कसोटी राहणार नाही.

सामर्थ्य नष्ट झालें आहे. जे ज्ञान शुद्ध मानले जात होते त्यात आशा आणि इच्छा, भीती आणि आश्चर्य ह्यांचा शिरकाव झालेला होता हे आता आपल्याला दिसून आले आहे. आणि आपल्या जीवनाला आधार देण्याची त्याची जी शक्ती होती ती सगळी त्यात शिरलेल्या ह्या घटकांनीच दिलेली होती हेही दिसून आले आहे. आपल्याला अनुकूल असलेल्या परिस्थितीचा फायदा कसा घ्यावा आणि प्रतिकूल परिस्थिती कशी टाळावी ह्यासंबंधीच्या सूचना आपल्याला घटना 'कशा' घडतात ह्याविषयीच्या ज्ञानापासून मिळू शकतात. पण सापेक्षत: खालच्या पातळीपेक्षा विशेष वरच्या जीवनाचे अस्तित्वकारण किंवा समर्थन आपल्याला त्यापासून मिळू शकत नाही.

एखाद्या दृष्टिकोणाची समर्थनीयता, किंवा असमर्थनीयता, त्याच्याशी संबद्ध असलेल्या वस्तूमध्ये नसते. ती त्याच्यातच असते. सबंध व्यक्तिमत्वाला त्याची जी उपयुक्तता असते तिच्यात असते. व्यक्तिमत्व म्हणजे दृष्टिकोणांचा एक संपूर्ण व्यूह. त्यात एखाद्या विशिष्ट दृष्टिकोणाचे जे स्थान असेल त्यावर त्याचे मूल्य अवलंबून असते. ही गोष्ट एखाद्या बालकाच्या साध्या दृष्टिकोणांच्या बाबतीत जितकी खरी आहे तितकीच ती एखाद्या सुसंस्कृत व्यक्तीच्या सूक्ष्म, बारकाव्यांनी गुंफल्या गेलेल्या, दृष्टिकोणांच्या बाबतीतही खरी आहे.

थोडक्यात म्हणजे, कल्पनानिष्ठ जीवनाचे समर्थन म्हणजे ते स्वत:च. ही वस्तुस्थिती मान्य करणे काही वेळा फार कठीण जाईल – उदाहरणार्थ एखाद्या प्रेमिकाला. पण ह्या वस्तुस्थितीला तोंड दिलेच पाहिजे. ही वस्तुस्थिती मान्य केली म्हणजे असे दिसून येईल की, इतर माणसांसंबंधीचे आणि जगाच्या सर्व अंगांसंबंधीचे जे दृष्टिकोण मानव जातीला उपयुक्त ठरले आहेत ते सगळे पूर्वी होते तसेच [आजही] राहिले आहेत आणि तितकेच मूल्यवान आहेत. ही वस्तुस्थिती मान्य करण्याबाबत जी नाखुशी जाणवते तिच्यावरून मी वर्णन केलेल्या वाईट सवयीचे किती प्राबल्य आहे ते दिसून येते. परंतु ह्यांपैकी बरेच दृष्टिकोण, पूर्वीसारखे मूल्यवान असले तरी, [आता वैज्ञानिक श्रद्धांपासून] मुक्त केले जात असल्यामुळे टिकवून धरणे अधिक कठीण होत आहे. कारण श्रद्धेचा आधार हवा असे अजूनही आपल्याला वाटते.

## ७. काही आधुनिक कवी

....spitting from the mouth the withered apple-seed.

T. S. ELIOT, *Ash Wednesday*.

**ज्यां**च्या कवितांच्या अभ्यासातून हे विचार उद्भवले त्या कवींकडे वळण्याची वेळ आता आली आहे. हार्डीपासूनच आपण अत्यंत स्वाभाविकपणे प्रारंभ करावा ह्याला बरीच कारणे आहेत. ज्याला मी निसर्गाचे अमानवीकरण म्हटले ते अखेर ज्या कालखंडात पूर्णपणे घडून आले तो सबंध कालखंड त्याच्या काव्यकर्तृत्वाने व्यापलेला आहे हे कारण तर आहेच. पण हा घडून आलेला बदल त्याच्या काव्यात स्पष्टपणे प्रतिबिंबित झाला आहे. त्याच्या *Collected Poems* मध्ये लहान पद्य-निबंध पुष्कळ आहेत आणि ते बहुतेक ह्याच विषयासंबंधी आहेत. पण ते निबंध कितीही जरी सूचक असले तरी आपल्या समकालीन पार्श्वभूमीचा पूर्णपणे आणि धीटपणे स्वीकार करणारा कवी म्हणून त्याला निवडून काढण्याचे कारण ते निबंध नव्हेत, किंवा त्याच्या ज्या कविता निः-संदिग्धपणे निसर्गाच्या अमानवी स्वरूपासंबंधी आहेत त्याही ह्या निवडीचे कारण नव्हेत. ह्या ठिकाणी गैरसमजुतीला थोडासा वाव आहे. इतर विषयांवरच्या त्याच्या ज्या कविता आहेत, – उदाहरणार्थ 'The Self

Unseeing', 'The Voice', 'A Broken Appointment' आणि विशेषत: 'After a Journey' – त्या कवितांचा एकंदर सूर, त्या हाताळण्याची पद्धती, आणि त्यांची लय हा हार्डीची निवड करण्यामागचा आधार आहे. एखाद्या कवितेत एखाद्या वस्तुस्थितीची स्पष्टपणे दखल घेतली गेलेली असली तरी एवढ्यावरूनच त्या कवितेने त्या वस्तुस्थितीचा स्वीकार केला आहे असे होतेच असे नाही, तर कविता ज्या मनोवृत्तींची बनलेली असते त्यांच्यात घडलेल्या नेमक्या परिवर्तनांतूनच असा स्वीकार केला गेला आहे की नाही ही गोष्ट कळू शकते. माझ्या ह्या निबंधात काही ठिकाणी, मिड्ल्टन् मरी ह्यांच्या काही मतांविरुद्ध रोख आहे असे वाचकांना वाटेल, पण त्यांनी आपल्या 'ॲस्पेक्ट्स् ऑफ लिट्रिचर' मध्ये हार्डीची कविता "आपण जे जाणतो आणि जे भोगले आहे त्याला कशी खास अनुरूप" आहे ते दाखवून दिले आहे. ते म्हणतात, "एखाद्या घटनेसंबंधी त्याची [हार्डीची] जी प्रतिक्रिया असते तिच्या मागे आणि तिच्या गाभ्यात विश्वासंबंधीची प्रतिक्रिया असते." मला जर विधान करायचे असते तर मी ते अशा प्रकारे केले नसते. पण एक व्याज-विधान म्हणून भावनात्मक दृष्टीने पाहिले तर ते उत्कृष्ट आहे. [हार्डीची कविता वाचताना] आपल्याला काय वाटले त्याची ते आठवण करून देते. खरे असे आहे की, हार्डी आपल्या उत्कृष्ट कवितांत जे करीत नाही त्याचे ह्या विधानात वर्णन आहे. विश्व ही अशी वस्तू आहे की, त्याच्यासंबंधी अमुक एका प्रतिक्रियेपेक्षा दुसरी एखादी प्रतिक्रिया अधिक यथार्थ ठरेल असे नाही. हे त्याने ओळखले असल्यामुळे चिंतनाचा विषय म्हणून विश्वासंबंधी तो [हार्डी] कोणतीच प्रतिक्रिया व्यक्त करीत नाही. मि. मरी ह्यांनी [हार्डीसंबंधी] आणखी एक विधान केले आहे, ते भावनात्मक आणि वैज्ञानिक अशा दोन्ही दृष्टींनी उत्कृष्ट आहे. ते म्हणतात, "हार्डीच्या प्रतिसादित्वात जी जाणीवपूर्वक ठेवलेली विशुद्धता आहे तिच्यामुळे तो इतर सर्व आधुनिक कवींपेक्षा श्रेष्ठ ठरतो. जगाच्या, हळूहळू वसणाऱ्या, डागाचा स्पर्श त्याला झाला नाही. विसरण्याचे जे व्यापक कारस्थान आहे, आणि ज्यात केवळ धंदेवाईक आशावादीच सामील आहेत असे नाही, त्या कारस्थानापासून तो [हार्डी] आरंभापासूनच अलिप्त राहिलेला आहे."

(चालू पिढीत माणसावर एक विलक्षण स्थित्यंतर ओढवलेले आहे हे ज्याला इतरांपेक्षा अधिक दु:खदपणे जाणवले आहे अशा एका लेखकाच्या लेखनातले हे उतारे आहेत. मात्र त्याचे [परिस्थितीचे] निदान चुकीचे आहे असे मला वाटते). ह्या उताऱ्यांतून हार्डीचे इंग्लिश कविताक्षेत्रातले स्थान आणि योग्यता फार चांगल्या रीतीने व्यक्त होते. कुठे तरी सांत्वन शोधण्याचा सगळ्यात अधिक मोह ज्यात झालेला आहे असे हे युग आहे. अशा ह्या युगात सांत्वन करून घेण्याचे ज्याने निर्धारपूर्वक नाकारले आहे असा हा कवी आहे. विस्मरणातून मिळणारे सांत्वन, श्रद्धांतून मिळणारे सांत्वन, ही दोन्ही त्याने बाजूला सारली आहेत. म्हणूनच त्याचे मन 'मृत्यू' ने विलक्षण व्यापलेले आहे. कारण उदासीन (indifferent) विश्व समोर असता माणसाच्या मनोवृत्ती स्वावलंबी होण्याची आवश्यकता 'मृत्यू' च्या चिंतनातच अत्यंत बोचकपणे जाणवते. इतक्याच स्वावलंबीपणाने आणि कणखरपणाने परिस्थितीचा स्वीकार करणे केवळ अत्यंत श्रेष्ठ अशा शोकात्म (ट्रॅजिक) कवींनाच साधले आहे.

हार्डीकडून डे ल मेअरकडे म्हणजे बरीच लांब उडी वाटेल. ज्यांनी डे ल मेअरच्या उत्तरकालीन कविता वाचल्या असतील त्यांना 'Who's that' मध्ये आणि '*The Veil*' मधल्या इतर कवितांत – जिथे तो त्याच्या उत्कृष्ट लेखनाच्या मानाने, जाणवेल इतका, कमी वैशिष्टयपूर्ण आहे त्या कवितांत – [हार्डीशी] मनोवेधक साम्ये आहेत हे मान्य होईल. [तरी देखील ही उडी लांबच आहे.] 'द पिग्ज् ॲण्ड द चारकोल बर्नर,' तसेच 'जॉन मोल्डी,' ह्या कवितांत समकालीन परिस्थितीची सूचना नाही. ज्याला ह्या अडचणींची काहीही माहिती नाही अशा एका जगासंबंधी, अशाच एका जगात बसून, तो लिहीत आहे. ज्ञान आणि भावना ह्यांतला फरक जिथे अजून उदय पावला नाही असे निव्वळ कल्पनेचे ते जग आहे. इतर अधिक चिंतनशील कवितांत, उदाहरणार्थ 'द ट्राइस्ट' मध्ये, जेव्हा तो 'केविलवाण्या मानवी आसे' ('poor mortal longingness') च्या बाबतीतल्या विश्वाच्या उदासीनतेला सरळ सामोरा जात आहे असे दिसते तेव्हा एक विलक्षण गोष्ट घडते. त्याचे शब्द काहीही असले तरी त्याच्या उद्गारांत ह्या उदासीनतेची

जाणीव व्यक्त होत नाही, तर तिच्यापासून मागे फिरावे, तिला विसरावे, आपल्या स्वतःच्या परिचित अशा स्वप्नकुंजाच्या उबेत आश्रयाला जावे, बाहेर उघड्यावर वाऱ्यात उभे राहू नये, अशी प्रेरणा व्यक्त होते. त्याची लय, त्याच्या सर्वच उत्कृष्ट कवितांना बिलगून असणारा त्याचा अनिर्वचनीय वैयक्तिक स्वर अंगाईसारखा आहे, वेदनाशामक आहे, गुंगी आणणारा आहे. त्याने झोप येते आणि स्वप्ने पडतात, अंधुक आकृतींची फिरती दृश्ये दिसतात; पण भविष्याचा साक्षात्कार घडत नाही, जागृती येत नाही. 'शहाण्यांच्या शब्दांनी ज्याला मुके केले आहे' ('Whom the words of the wise have made dumb') त्या आधुनिक माणसाच्या भवितव्याचा तो [डे ल मेअर] विचार करीत आहे असे जेव्हा खूपच दिसते त्यावेळीसुद्धा त्याच्या पद्यपंक्तींचा रोख मनाने प्रवास करणाऱ्याचा प्रवास जिथून सुरू होतो 'त्या रम्य सुवर्ण-प्रदेशाकडे जाण्याचा'च ('Seeking after that sweet golden clime.') असतो.

ह्या आक्षेपाला एक अपवाद आहे. (आतापर्यंत लिहिले आहे ती एकाअर्थी प्रतिकूल टीका आहे आणि श्रेष्ठ कवीखेरीज इतरांविरुद्ध करू नये अशी आहे). एक कविता अशी आहे की, जिथे वाऱ्याचा सोसाटा अंगावर घेण्याबाबत नाखुषी नाही. ती कविता म्हणजे 'पीकॉक पाय्' मधली 'The Mad Prince's Song' पण ह्या कवितेचा आत्मा, तिची प्राणदायी प्रेरणा ज्याने आश्रय घेण्याचे इतर अनेकां-पेक्षा अधिकच नाकारले आहे अशा एका कवीपासून आलेली आहे. 'The Mad Prince's Song' ची प्रेरणा 'हॅम्लेट' आहे.

मागल्या एखाद्या पिढीत जन्माला येण्याऐवजी ह्या पिढीत जन्माला आल्यामुळे निर्माण झालेल्या अडचणी डावलण्याच्या आणखी दोन पद्धती डब्ल्यू. बी. येट्स् आणि डी. एच. लॉरन्स ह्यांच्या कवितांत दिसतात. डे ल मेअर लहान मुलांच्या स्वप्नसृष्टीचा आश्रय घेतो. येट्स् काही काळ काळ्या मखमली पडद्यांमागे आणि वानप्रस्थाच्या (Hermetist) स्वप्नसृष्टीत गेला तर लॉरन्सने स्वतःच्या ठिकाणी 'बुशमन' चे मन पुनः निर्माण करण्याचा थोर प्रयत्न केला. अडचणी टाळण्याचे आणखीही मार्ग कवींना मोकळे आहेत. दुसरे एकच उदाहरण घेऊ

इंग्लण्डन्चे. तो ग्रामीण भागात जातो. पण फारच थोडे लोक त्याच्या मनोवृत्तीने त्याच्याबरोबर तिथे जातात. उलट येट्स् आणि लॉरन्स ह्यांच्या कविता पुष्कळ लोक वाचीत असले किंवा नसले तरी पराभूत माणसांच्या ठिकाणी ज्या वृत्ती फारच सहजपणे दिसतात त्यांचे ते दोघे प्रतिनिधित्व करतात.

येट्स्च्या रचनेत आरंभापासूनच तत्कालीन क्रियाशील आस्थांचा अव्हेर दिसून येतो. पण 'The Wanderings of Usheen', 'The Stolen Child', आणि 'Innisfree' ह्या कविता लिहिणारा हा कवी आरंभी तत्कालीन संस्कृतीपासून मागे फिरला, आणि जे त्याच्या पूर्ण परिचयाचे होते, आणि ज्याचा कृषीवलांनी – श्रद्धा नाही तसेच अश्रद्धाही नाही अशा वृत्तीने–स्वीकार केला होता त्या लोक-साहित्याच्या विश्वात शिरला. लोक-साहित्य आणि आयरिश भूप्रदेश, त्यातले वारे, अरण्ये, जलाशय-नद्या, बेटे आणि समुद्रपक्षी, आणि काही काळ जिने त्याला सामान्य कवीपेक्षा वरच्या पातळीवर नेले अशी विलक्षण साधी आणि सरळ भिडणारी प्रेम-कविता ही त्याची आश्रयस्थाने होती. पुढे मग, नाट्याबरोबरच्या अनिर्णीत लढाईनंतर, तत्कालीन संस्कृतीचाच नव्हे तर प्रत्यक्ष जीवनाचाच त्याने अधिक जोरदारपणे अव्हेर केला आणि तो निसर्गातीत (supernatural) जगाकडे वळला. पण आयरिश शेतकऱ्यांच्या कथा आणि आयरिश भूप्रदेश ह्यांचे विश्व हे जसे त्याच्या स्वाभाविक किंवा नित्य परिचयाच्या अनुभवांचा भाग होते तसे 'चिरंतन भाववृत्ती' ( eternal moods ) दिव्य अस्तित्वे (supernal essences), आणि अमर जीव (immortal beings) ह्यांचे विश्व नव्हते. ज्याच्यासंबंधी त्याला काहीही खात्री नव्हती अशा प्रतीकात्मक कल्पनाचित्रांच्या विश्वाकडे तो वळला. ही साशंकता काही अंशी, स्फूर्ती मिळवण्याचे एक तंत्र म्हणून समाधीचा (trance) तसेच बोधावस्थेच्या विलग्न टप्प्यांचा (dissociated phases of consciousness) अवलंब केल्यामुळे निर्माण झाली होती. ह्या विलग्न अवस्थांमध्ये जे साक्षात्कार होतात त्यांचा नित्याच्या अनुभवांशी पुरेसा संबंध नसतो. येट्स्च्या गूढ (transcendental) कवितेच्या दुबळेपणाचे कारण काही अंशी ह्यात सापडेल. विचार आणि भावना ह्यांमधल्या स्वाभाविक संबंधांची बुद्धिपुरस्सर केलेली उलटापालट

हे उरले-सुरले कारण असू शकेल. आपल्याला दिसणारी कल्पनादृश्ये (visions) ही [विशिष्ट] विचारांची प्रतीके आहेत अशी येट्स्‌ची समजूत होती. काही कल्पनादृश्यांच्या दर्शनाबरोबरच जी एक दृढ विश्वासाची भावना येते ती भावना म्हणजे ती कल्पनादृश्यें ज्या विचारांची प्रतीकें आहेत असे त्याला वाटे त्या विचारांच्या अस्तित्वाचा पुरावा असे त्याने मानले. येट्स्‌च्या दृष्टीने 'The Phases of the Moon' ह्या कवितेचे महत्त्व ती ज्या वृत्ती जागृत किंवा मूर्त करते त्यात नाही तर 'जाणत्या' (initiate) वाचकाला तिच्यापासून ज्या (गूढ) तत्त्वांचा लाभ होतो त्यात आहे.

समाधीचा अवलंब, आणि विज्ञानाने जे विश्वचित्र दिलेले आहे त्याच्या-ऐवजी एक नवे विश्वचित्र शोधून काढण्याचा प्रयत्न करणे, हे आपल्या दृष्टीने पाहता येट्स्‌च्या काव्यातले दोन अर्थपूर्ण मुद्दे आहेत.[१] आणि सर्वसामान्य माणसांविषयी विलक्षण कडवट असा तिरस्कार [त्याच्या काव्यात] कधी कधी दिसतो तो तिसरा मुद्दा होऊ शकेल.

हा तत्त्वविषयक प्रश्न पुन्हा एकदा, पण अधिक स्पष्टपणे उद्भवतो तो लॉरेन्सच्या बाबतीत. पण इथे एक गोष्ट आपल्याला साहाय्यक आहे. त्याच्या अनेक कविता ज्या भूमिकांचा पुरस्कार करतात त्यांचे सविस्तर गद्यविवरण *Fantasia of the Unconscious* मध्ये आलेले आहे. ही बाब अशा रीतीने मांडण्यात गैर किंवा अन्यायाचे असे काही नाही. कारण लॉरेन्सच्या पद्यरचनेचा पुष्कळसा भाग गद्यच आहे. इतकेच नव्हे तर वैज्ञानिक गद्य आहे. किंवा खरे म्हणजे एखाद्या मानसशास्त्र-ज्ञाच्या टिपणवहीतली, मधून मधून स्पष्टीकरणे टाकलेली, ती टिपणे आहेत असेही म्हणता येईल. ही त्याची टिपणे आणि स्पष्टीकरणे मनोव्यापाराच्या अभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत चित्तवेधक आहेत हे जरी मान्य केले तरी एक प्रश्न शिल्लक राहतोच. तो म्हणजे ज्या कवीने 'Ballad of Another Ophelia' आणि 'Aware' तसेच *Birds, Beasts and Flowers* आणि *The White Peacock* ह्यातली काही

---

[१] आपल्या युगातला सर्वश्रेष्ठ कवी म्हणून येट्स्‌चा विकास होईल किंवा *Songs for Music Perhaps* मध्ये चमत्कार आढळतील अशी कल्पना *The Tower* च्या पूर्वी कोणाला येऊ शकली असती का?

पृष्ठे लिहिली त्याने, जे मार्ग तोच दाखवू शकेल असे एक वेळ दिसत होते त्या मार्गापासून, त्याच्या उत्साहाची दिशा चुकल्यामुळे, इतके बाजूला का भटकत जावे ?

संस्कृतीविरुद्धची लॉरन्सची बंडखोरी मुळात उत्स्फूर्त असावी, विशेष अशा श्रद्धांपासून मुक्त अशी तीव्र भावनात्मक प्रतिक्रिया असावी, असे दिसते. ती प्रत्यक्ष अनुभवातून उद्भवलेली होती. सहजप्रवृत्तींच्या प्रत्यक्ष प्रेरणेमुळे नव्हे तर वस्तूंच्या मानीव प्रकृतिस्वभावामुळे लोक त्यांच्यासंबंधी जे दृष्टिकोण स्वीकारतात अशा सर्व दृष्टिकोणांचा तो तिटकारा करू लागला. जे परंपरागत संकेत, ज्या आदर्श कल्पना, पुरुष-पुरुष आणि स्त्री-पुरुष ह्यांच्या संबंधांच्या आड येतात आणि ज्यांमुळे त्यांच्या स्वाभाविक परस्पर प्रतिक्रिया अशक्य होतात ते संकेत आणि त्या कल्पना सर्व अनिष्ट गोष्टींच्या मुळाशी आहेत असे त्याला वाटे. काही अंशी त्याची बंडखोरी समर्थनीय होती ह्यात शंका नाही. ह्या आदर्श कल्पना – उदाहरणार्थ माणसा-माणसातली समता, आणि प्रीती ही मूलतः सहानुभूती आहे हे तत्त्व – म्हणजे ज्या पद्धतीसंबंधी वर सविस्तर चर्चा करण्यात आली आहे त्या पद्धतीने काही दृष्टिकोणांना आधार देण्यासाठी आणि दृढ करण्यासाठी अनुचितपणे (illicitly) घुसडल्या गेलेल्या श्रद्धा होत. जी नीतिकल्पना स्वतःसिद्ध नसून श्रद्धांवर आधारलेली आहे तिचा आरंभीच त्याग केल्यामुळे लॉरन्सचे लेखन हे माझ्या मुख्य प्रतिपादनाचे एक उत्तम उदाहरण झाले आहे. पण दोन साध्या आणि टाळता येण्याजोग्या चुकांमुळे त्याच्या ह्या बंडखोरीचे मोल पुष्कळच कमी झाले आहे. एक म्हणजे अशा श्रद्धा निर्माण होतात ह्याचे कारण, ज्या दृष्टिकोणांना त्या आधार देतात ते आधीपासूनच अस्तित्वात असतात ह्याकडे त्याने दुर्लक्ष केले. एखाद्या दृष्टिकोणाचा आधार वाईट असला म्हणजे तो दृष्टिकोणच वाईट असे तो समजला. सामान्यतः असा दृष्टिकोण हा एक प्रकारे लादलेला दृष्टिकोण असतो, हे खरे आहे. पण ही वेगळी बाब आहे. दुसरे म्हणजे परंपरागत श्रद्धांच्या ऐवजी आपल्या स्वतःच्या अशा वेगळ्या श्रद्धा अगदी वेगळ्या अशा दृष्टिकोणांना आधार देण्यासाठी पुढे आणून त्याने ह्या [जुन्या] रोगाचे निवारण करण्याचा प्रयत्न केला.

आदिम मनःस्वभावाचे उदाहरण म्हणून ह्या श्रद्धांच्या उत्पत्तीकडे पाहणे मनोरंजक होईल. ज्या दृष्टिकोणांचा लॉरन्सने आश्रय घेतला ते मानवी विकासाच्या अगदी आरंभीच्या अवस्थेतले असल्यामुळे ज्या साधनांनी त्याने त्यांना आधार दिला तीही त्याच युगातली असावीत, किंवा त्याने जे विश्व-चित्र निर्माण केले ते *The Golden Bough* मध्ये वर्णन केले आहे तसे असावे ह्यात आश्चर्य नाही. ह्यात चालणाऱ्या मानसिक प्रक्रियेचा आराखडा पुढीलप्रमाणे आहे : पहिली गोष्ट म्हणजे विलक्षण निश्चितपणे शरीरात अधिष्ठित झालेल्या उत्कट अशा एखाद्या भावनेचा अनुभव घ्या. ह्याचे असे वर्णन करता येईल. "जणू काय आपला सौर जालक (solar plexus) एक प्रकारच्या गूढ उत्कट अशा भावनाशक्तीच्या प्रवाहाने दुसऱ्या एखाद्या व्यक्तीशी जोडला गेला आहे अशी जाणीव." ज्यांच्या भावनांचा [शरीरात] विशिष्ट ठिकाणी केन्द्रित होण्याकडे कल असतो त्यांना ही जाणीव परिचित असेल. ह्यानंतरची दुसरी पायरी म्हणजे "मला माझ्या जाणिवांवर विश्वास ठेवलाच पाहिजे." असे म्हणणे. तिसरी पायरी म्हणजे ह्या जाणिवेलाच प्रातिभ ज्ञान असे नाव देणे. शेवटली पायरी म्हणजे "माझे सौर जालक . . . . . . . . . . . . आहे हे मला माहीत आहे." असे म्हणणे. अशा रीतीने आपण अशा शंकारहित ज्ञानापर्यंत येऊन पोचतो की, सूर्याला जी शक्ती मिळते ती पृथ्वीवरील जीवनापासून मिळते, आणि खगोलशास्त्रज्ञ चंद्राबद्दल वगैरे जे काही सांगतात ते चुकीचे आहे.

ह्या युक्तिवादातल्या सदोष पायऱ्या ह्या विश्लेषणात दिसतात तशा सुस्पष्ट नसतात. एखाद्या भावनेचे प्रातिभ ज्ञान आणि एखाद्या भावनेच्या द्वारा होणारे प्रातिभ ज्ञान ह्यातला फरक ओळखणे नेहमीच सोपे नसते. तसेच एखाद्या भावनेचे वर्णन आणि ती भावना ह्यांतला फरकही व्यवहारात नेहमीच जाणवण्याजोगा नसतो. आपण आपल्या भावनांवर विश्वास ठेवलाच पाहिजे. ह्याचा अर्थ असा की, आपण त्यानुसार वर्तन केले पाहिजे. नाही तरी ज्यावर विश्वास ठेवावा असे दुसरे काही आपल्याजवळ नसतेच. भावनांवर असा विश्वास ठेवणे आणि भावनात्मक भाषेत केलेल्या त्यांच्या वर्णनावर विश्वास ठेवणे

ह्यात गोंधळ करणे ही एक अशी चूक आहे की, ती करण्याला सर्व परंपरागत नीतिकल्पना आपल्याला उत्तेजन देत असतात.

येट्स् आणि लॉरेन्स ह्यांच्यासारख्या परस्परांपासून अत्यंत भिन्न आणि तरीही अत्यंत प्रतिभासंपन्न अशा कवींच्या काव्यात असे एकाच प्रकारचे अनर्थ दिसावेत ह्याचा अर्थ लक्षात घेण्यासारखा आहे. सांकेतिक श्रद्धांचा परंपरागत आधार दोघांनाही असमाधानकारक – त्यांच्या दृष्टिकोणांना आधार म्हणून निरुपयोगी – वाटला. अगदी वेगळ्या मार्गांनी, पण दोघांनीही ह्यावर उपाय म्हणून वेगळ्या श्रद्धांचा संच शोधण्याचा प्रयत्न केला. त्यापैकी कोणालाच विज्ञानाने दाखवलेले विश्वचित्र पर्याय म्हणून स्वीकारयोग्य वाटले नाही. अशा प्रकारच्या आधारभूत श्रद्धांवाचूनही काव्यनिर्मिती होणे शक्य आहे अशी कल्पनाही त्या दोघांपैकी कोणी केली नाही.[1] ह्याचे कारण कदाचित असे असेल की, ते एकमेकांपासून कितीही वेगळे असले तरी अतिशय गंभीर-प्रकृती कवी होते. सर्व श्रद्धांपासून पूर्णपणे अलिप्त राहणे जिथे सोपे आहे अशी बरीचशी कविता लिहिणे अर्थातच शक्य आहे. पण ही कविता विशेष महत्त्वाची अशी कधी नसते. ह्याचे कारण असे आहे की, कवितेत श्रद्धांना शिरकवण्याची इच्छा होणे हे त्यांच्याशी संबंधित असलेल्या दृष्टिकोणाच्या महत्त्वाचे, आणि ते महत्त्व किती आहे ह्याचे, निदर्शक असते. काटेकोरपणे आणि संकुचित अर्थांनी ज्यांना मूलतः धार्मिक म्हणता येईल अशा श्रद्धांचा सध्याच्या काळात संबंध येण्याचा संभव फार कमी आहे. विषयाचे महत्त्व आश्चर्यकारकपणे बदलत असते. उदाहरणार्थ, धार्मिक विषयावर चर्चा करण्याकरिता म्हणून १९१० मध्ये जी मंडळे विद्यापीठात स्थापन झाली होती त्या मंडळांत, हे पुस्तक पहिल्यांदा लिहिले गेले त्यावर्षी, म्हणजे १९२६ मध्ये, लैंगिक विषयांवर चर्चा होत असे, आणि आज १९३५ मध्ये त्याच मंडळांत राजकीय विचारप्रणालींवर चर्चा चालते.

तरी पण [श्रद्धांपासून] अलिप्त राहण्याची आवश्यकता वाढत चालली आहे. ह्याचा अर्थ असा नाही की, जिच्यात श्रद्धा चटकन शिरतात

---

[1] Cracked Mary (किंवा Crazy Jane) अशी जी गीते रचण्यात येट्स् नंतर यशस्वी झाला ती ह्या प्रकारची कविता आहे असे मला वाटते.

ती परंपरागत कविता कालबाह्य होत चालली आहे. मात्र गोंधळल्यावाचून ती कविता समजणे अधिकाधिक कठीण होत चालले आहे. त्यासाठी वाचकाच्या कल्पनाशक्तीला अधिक ताण द्यावा लागतो. त्याचे मन अधिक निर्लेप असावे लागते.

इथे आपण एक फरक केला पाहिजे. सध्या ज्या टिकू शकणार नाहीत अशा श्रद्धांवर आधारलेल्या अनेक भावना आणि दृष्टिकोण, त्यांचा पूर्वी असलेला श्रद्धांचा आधार नाहीसा झाला तरी, टिकू शकतात. त्याचे कारण असे आहे की, त्या भावना आणि ते दृष्टिकोण थेट जीवनाच्या गरजांतून निष्पन्न झालेले असतात आणि त्यांना दुसरे अधिक स्वाभाविक आधार लाभलेले असतात. ज्या प्रमाणात ह्या गोष्टी त्यांच्याभोवती गोळा झालेल्या श्रद्धांमुळे विकृत झाल्या नसतील त्या प्रमाणात त्या पूर्वीसारख्याच टिकून राहू शकतील. पण जे श्रद्धांतूनच निर्माण झाले आहेत आणि ज्यांना दुसरा कोणताच आधार नाही असे इतर दृष्टिकोण आहेत. जे बदल घडतील असा अंदाज ह्या विवेचनात वर्तविण्यात आला आहे ते बदल जर घडत राहिले तर हे दृष्टिकोण कोलमडतील. हे दृष्टिकोण नष्ट झाले तर काही कविताप्रकार – उदाहरणार्थ बरीचशी दुय्यम दर्जाची भक्तिपर पद्यरचना – कालबाह्च होतील. 'बुद्धी विरुद्ध भावना' अशी जी गुंतागुंत आहे ती सोडवली गेली म्हणजे ज्या वाङमयाला खूप महत्त्व देण्यात आले आहे त्यासंबंधीचीही आस्था – [मानवी] मनाचा इतिहास म्हणून राहील तेवढी वगळता – कमी होण्याचे प्रकार घडून येतील. उदाहरण म्हणून दोस्तोयेव्हस्कीच्या लेखनातल्या तत्त्वचर्चात्मक भागांचा निर्देश करता येईल. दोस्तोयेव्हस्की हा आपल्या स्वतःच्या काळाचा एक भाग होता म्हणून त्याला ह्या गुंतागुंतीशी विलक्षण झुंज घ्यावी लागली. प्राचीन काळच्या श्रेष्ठ कवींच्या जोडीची सचोटी ज्याच्या ठिकाणी आहे असा आजचा कवी अपरिहार्यपणे, विचार आणि भावना[1] (feelings) ह्यांच्यासंबंधीच्या प्रश्नाने, पूर्वीच्या कवींना कधीही व्हावे लागले नाही अशा प्रकारे त्रस्त झाला आहे.

---

[1] ज्याचा पडताळा पाहणे शक्य आहे तिथे श्रद्धा कधीही नव्हती, किंवा उलटपक्षी पडताळा अशा प्रकारचा की ज्याच्याशी श्रद्धेचा काहीही संबंध नाही, हा मुद्दा जर स्पष्ट असेल तर हा प्रश्न प्रत्यक्षता आणि श्रद्धा ह्यासंबंधीचा आहे असे मी म्हणेन.

संस्कृतीच्या उद्गमासंबंधीच्या आधुनिक संशोधनाच्या एका प्रवर्तकाला अलीकडेच असे विचारण्यात आले की, "तुमच्या ह्या कामाचा धर्माशी काही संबंध आहे काय?" तेव्हा त्याने उत्तर दिले की, "आहे. पण सध्या मी फक्त 'तोफांच्या जागा ठरवण्यात' गुंतलो आहे". मानसशास्त्रात अलीकडे झालेल्या प्रगतीच्या संभाव्य परिणामांसंबंधीही असेच उत्तर दिले जाण्याची शक्यता आहे. आणि ते केवळ धर्माच्या बाबतीतच नव्हे तर आपल्यासंबंधीच्या आपल्या ज्या परंपरागत श्रद्धा आहेत त्यांच्या सबंध इमल्याच्या बाबतीत. पुष्कळांचा असे समजण्याकडे कल आहे की, आपल्या परंपरास्वीकृत कल्पनांवरच्या हल्ल्यांच्या ज्या सरबत्तीला, समजा, गॅलिलीयोपासून सुरुवात झाली आणि चढता चढता जिची पराकाष्ठा डार्विनवादाच्या वेळी झाली तिचा दम आइन्स्टाइन आणि एडिंग्टन ह्यांच्या वेळी तुटला आणि आता तिचा जोर ओसरला असून लढाई संपण्याच्या बेतात आहे. हा दृष्टिकोण फारच आशावादी दिसतो. विज्ञानाच्या सगळ्यात भयावह अशा कर्तृत्वाला आता कोठे आरंभ होत आहे. म्हणजे माझ्या मनात मनोविश्लेषणशास्त्र किंवा वर्तनवाद नाही, तर ह्यांना आपल्यात सामावून घेणारा सगळाच विषय आहे.

गेल्या शतकातल्या हल्ल्यांच्या परिणामी आपल्या परंपरांचे संरक्षण ज्या हिंडेन्बुर्ग फळीपर्यंत मागे हटले ती अधिकृतपणे धरून ठेवण्याचे काम (शाळांतून वगैरे) अजूनही चालू राहील. पण बचावाच्या किंवा हल्ल्याच्या कशाच्याच लायकीची नाही म्हणून ती खरोखर सोडून देण्यात आली आहे. लढाई आता दुसरीकडेच चालली आहे आणि ती बौद्धिक चर्चेला योग्य अशा विषयांवर राहिलेली नाही. 'श्रद्धा कशावर ठेवावी ?' ह्यावर चर्चा करणे शक्य आहे. पण आज प्रश्न हा नाही. त्याची जागा "आपल्या मिथ्स्[१] (myths) च्या ज्या वेगवेगळ्या श्रेणी आहेत त्यांची वर्गवारी कोणत्या वेगवेगळ्या श्रद्धाप्रकारांच्या साधनांनी करावी ?" ह्या प्रश्नाने घेतली आहे. आणि ह्या प्रश्नाचे उत्तर चर्चेतून मिळत नाही. प्रत्यक्ष जगण्यात मिळते. त्यातली जी सगळ्यात खालची श्रेणी आहे आणि जिच्या बाबतीत शंकेला, ऐच्छिकतेला किंवा

[१] हा शब्द अवमानदर्शकच आहे असे नाही. पाहा *Coleridge on Imagination*, प्र. ७.

टाळाटाळीला जवळजवळ मुळीच वाव नाही – उदाहरणार्थ चालताना टाक-लेल्या प्रत्येक पावलाची सुरक्षितता जिच्यामुळे साधते ती अवलोकनाची नित्यक्रिया. ज्यांमुळे आपल्याला आगगाडी मिळते किंवा आपली गाडी चुकते त्या प्रकारच्या अपेक्षा किंवा गृहीते – अशा श्रेणीतल्या मिथ्स्ना त्यांच्या गोतावळ्यातल्या इतर मिथ्स्वर (over its own members) अद्वितीय अधिकार असतो. हा अधिकार ही श्रेणी तिच्यातून निर्माण होणाऱ्या विज्ञानांना देते. मात्र त्यांची जी ऐच्छिक किंवा तात्विक अंगे असतात त्यांना देत नाही. आपल्या विचाराच्या प्रत्येक क्षेत्रावर ही विज्ञाने वाढत्या प्रमाणात आक्रमण करीत आहेत. त्यांना तुल्यबल, किंवा प्रतिकार करू शकणारे, असे जे काही भेटते त्याचेही सामर्थ्य, पडताळून पाहता येण्यासारख्या घटनांमधल्या त्याच मूलस्थानांतून प्राप्त झालेले असते.

ज्या मानाने एखादा प्रश्न त्यांच्या विशिष्ट अधिकारक्षेत्रात येतो त्या मानाने ती [विज्ञाने] त्यासंबंधी निर्णय देतात; आणि विशिष्ट असा तत्संबद्ध विश्वास अथवा स्वीकार तिथे उचित असतो. इतर श्रेणीतल्या मिथ्स्कडून दिले गेलेले आव्हान आत्मघातक ठरते. आपल्या स्वतःच्या श्रेणीसंबंधीच्या चुकीच्या कल्पनेने त्या [मिथ्स्] हे आव्हान देतात. (आपली श्रेणी जर त्यांनी धरून ठेवली असती तर, अधिक समावेशक आस्थांशी संबद्ध असल्याकारणाने ती उच्चतर ठरली असती.) आणि तसे करण्यामुळे त्यातून ज्या प्रकारच्या श्रद्धा आकाराला येतात त्यांचा दर्जा कमी करतात. धोका असा आहे की, विज्ञानाजवळ आपल्यासंबंधी आपल्याला सांगण्यासारखे बरेच अधिक असल्यामुळे ते इतर मिथ्स्ना अशी चूक करण्याला अधिकाधिक प्रवृत्त करील आणि असे करून त्याला आव्हान देण्याला त्यांना चिथावील आणि शेवटी शरण येण्याला भाग पाडील. पण त्यांचे कार्य हे विज्ञानाचे कार्य नाही. ज्या-प्रमाणे विज्ञान जे देते ते त्या देत नाहीत त्याचप्रमाणे त्या जे देतात ते विज्ञान देऊ शकत नाही.

जो संघर्ष उद्भवायलाच नको होता तो जर आणखी वाढला तर आजपर्यंत केव्हाही अनुभवला नाही अशा नैतिक गोंधळाला माणसाला तोंड द्यावे लागेल असे दिसते. अशा परिस्थितीत, मी घेतलेल्या

उताऱ्यात मॅथ्यू आर्नल्ड निक्षून सांगतो त्याप्रमाणे आपले आश्रयस्थान काव्य हेच आहे. ते आपले तारण करण्याला समर्थ आहे. पण 'तारण' ह्या शब्दात काही लोकांना निंदा दिसते म्हणून आपण असे म्हणू की, आपल्याला टिकवून ठेवण्याला, तसेच संभ्रम आणि वैफल्य ह्यांपासून आपली सोडवणूक करण्याला, काव्यच समर्थ आहे. काव्य-कार्य हे विज्ञानापलीकडल्या (supra-scientific) मिथ्‌स्‌चे उगमस्थान आहे आणि काव्याची परंपरा ही त्यांची संरक्षक आहे. "कोणत्याही समाजाचे काव्य त्या समाजाच्या जिवंत भाषेपासून आपले जीवन घेते आणि आपल्याकडून तिला जीवन देते. तिच्या बोधावस्थेचा (consciousness) चरमोत्कर्ष, तिचे सर्वोच्च सामर्थ्य, आणि तिची सूक्ष्मतम संवेदनशीलता तिच्या काव्यात व्यक्त होते." असे माझ्या पिढीच्या सर्वश्रेष्ठ कवीने अलीकडेच लिहिले आहे.[१] हे सामर्थ्य काय आहे, त्याने आपल्याला काय दिले आहे, आणि त्याला धोका कशापासून आहे ह्याचा आपण अधिक विचार केला पाहिजे हेच मला माझ्या ह्या प्रतिपादनातून सांगायचे आहे.

[१] टी. एस. एलियट : *The Use of Poetry* पृ. १५.

# परिशिष्ट

ज्यांच्याबद्दल गैरसमज होण्याची शक्यता आहे असे दोन मुख्य शब्द वरील विवेचनात आले आहेत. आणि काही वाचकांचा त्यामुळे गैरसमज झालेलाही आहे. ते दोन शब्द म्हणजे 'निसर्ग' आणि 'श्रद्धा'.

'निसर्ग': हा उघडच असा शब्द आहे की, त्याचा अनेक अर्थांनी उपयोग करता येईल. ज्यात आपण राहतो आणि ज्याचा आपण एक भाग आहो 'ते' सर्व; तसेच ह्या 'ते' ची अगदी तपशीलवार आणि सुसंगत अशी जी माहिती आपल्याला मिळण्यासारखी असेल तिच्याशी जुळणारे असेल तेही त्या अर्थात समाविष्ट होईल. किंवा आपल्याला स्वतःला (आणि इतर मनांना) बाजूला काढून 'निसर्ग' म्हणजे आपल्यावर जे प्रभाव पाडते 'ते' असे मानायचे (असे करताना आपल्या शरीराच्या चयापचयाचा विसर पडू देऊन चालणार नाही). किंवा जी आपल्या अनुभवाचा विषय होते अशी 'वस्तू' असे मानायचे. (असे मानले तर अनुभवण्याचे जितके वेगवेगळे प्रकार आपण करू शकू तितके वेगवेगळे 'निसर्ग' होतील). आणि मग एका संस्कृतीच्या दृष्टीने जे 'नैसर्गिक' ते दुसऱ्या संस्कृतीच्या दृष्टीने विचित्र आणि कृत्रिम ठरते (पाहा 'मेनशियस ऑन द माइण्ड', प्रकरण ३). त्यात आणखी फसगत अशी की, ह्या प्रकारात दृष्टी आणि दृश्य ही अभिन्न असल्यामुळे आणि हा नित्याचाच चर्चेचा विषय असल्यामुळे, असे होण्याची शक्यता आहे की, आपल्या समजुतीप्रमाणे आपण एकच भाषा वापरीत असू आणि तरी 'निसर्गा' मध्ये अगदी वेगळे आशय भरीत असू. आणि मग आपल्याला तिथे जे आढळेल ते आपण तिथे जे ठेवले त्याच्याशी असंबद्ध नसेल.

'कोलरिज ऑन इमॅजिनेशन' ह्या पुस्तकाच्या सहाव्या आणि सातव्या प्रकरणात मी ह्या प्रश्नांची अधिक चर्चा करण्याचा प्रयत्न केला आहे.

'श्रद्धा': दोन 'श्रद्धां' मध्ये पुढील प्रकारांनी भेद होऊ शकतील. (१) त्यांचे विषय, (२) त्यासंबंधीची विधाने किंवा त्यांची अभिव्यक्ती, (३) श्रद्धा ठेवण्याच्या पद्धती, (४) त्यांचे आधार, (५) त्यांना निमित्त होणारे प्रसंग, (६) इतर 'श्रद्धां'शी असणारे त्यांचे संबंध, (७) संभाव्य कृत्यांशी असणारा त्यांचा संबंध, (८) आणि इतर प्रकारांनी. इतरांच्या श्रद्धा (आणि बहुधा आपल्या देखील) काय आहेत हे कळण्याचे मुख्य साधन म्हणजे त्यांसंबंधी केली गेलेली विधाने किंवा इतर प्रकारांनी झालेला त्यांचा आविष्कार. पण अगदी वेगळ्या श्रद्धा एकाच पद्धतीने अभिव्यक्त होणे शक्य आहे. विचाराश्रित (speculative) मत व्यक्त करण्यासाठी वापरलेले बहुतेक शब्द 'श्रद्धा' ह्या शब्दाइतकेच संदिग्ध असतात. तरी देखील अशा शब्दांच्या साहाय्यानेच श्रद्धा-विषय ओळखणे भाग पडते.

पण 'श्रद्धे'च्या बाबतीत आणखी एक अडचण आहे. कारण त्या शब्दाने, किंवा अंशत: समानार्थक अशा इतर शब्दांनी, त्यात सामान्यत: समाविष्ट असलेल्या (आणि गोंधळवून टाकलेल्या) अनेकविध दृष्टिकोणांचा (३) बोध होत नाही. ह्या दृष्टिकोणात असलाच तर केवळ प्रमाणभेद आहे असेच बहुधा मानले जाते. 'प्रमाणभेद कशाचा?' तर 'श्रद्धेचा' असे उत्तर दिले जाईल. पण असे उत्तर देणे म्हणजे प्रेमाचे सर्व प्रकार हे प्रमाणभेदाचेच असतात असे म्हणण्यासारखे आहे. विषयभेदामुळे त्यात आणखी काय फरक पडत असेल तेवढाच. अशा प्रकारची ढोबळ अति-सुबोधीकरणे मनाच्या संरचनेचा विपर्यास करतात आणि काही सदिच्छू प्रवचनकारांच्या हातची, लोकांची मनें वळवणारी अशी, ती आवडती साधने असली तरी ती अनर्थावह आहेत.

एक प्रकारच्या निर्विकार संशोधनाला इथे फार मोठे क्षेत्र उपलब्ध आहे. पण त्या प्रकारचे संशोधन फारसे झालेलेच नाही. रिकामपण अधिकाधिक मिळू लागेल अशी धास्ती आज जगात वाटू लागली आहे. अशा परिस्थितीत महत्त्वाच्या आणि ज्यात संशोधनाला वाव आहे अशा सूक्ष्म गोष्टींच्या बाबतीत अधिरेपणा करून चालणार नाही.

तेव्हा 'निसर्ग' ह्या शब्दाप्रमाणे 'श्रद्धा' ह्या शब्दामुळेही गैरसमज निर्माण झाले तर त्यामुळे क्षुब्ध होता कामा नये किंवा आश्चर्यचकितही होता कामा नये. हे लहानसे पुस्तक वाचकांपुढे ठेवून मी स्वतःला त्यांच्या हाती सोपवलेच आहे. आता त्यांत टीपांची भर घालून पृष्ठ संख्या दुप्पट केल्याने त्या परिस्थितीत काही सुधारणा होण्याची शक्यता नाही. हा विषय इतका अफाट आहे की, त्यावर कितीही मोठा ग्रंथ लिहिला तरी त्यात ह्या विषयासंबंधी लेखकाला वेळोवेळी काय वाटले ह्याची स्थूल रूपरेषा देण्यापलीकडे अधिक काही करता येणार नाही.

## फेरविचार (Reorientation)

'काव्यवाचनाच्या अनुभवा' संबंधी मी जे लिहिले आहे त्याचा बराचसा भाग 'प्रिन्सिप्ल्स ऑफ लिटररी क्रिटिसिझम्' मध्ये मी ज्या तत्त्वांचे अधिक तपशीलवार विवरण केले आहे त्यांचेच सुबोधीकरण आहे. त्यानंतर मला असे दिसून आले आहे की, त्यांतली काही तत्त्वे चुकीची नसली तरी अविकसित आणि चुकीच्या अर्थाने घेतली जाऊ शकतील अशी आहेत. आता मी जे विवेचन करीत आहे त्यात माझा प्रयत्न त्या विचारबंधातल्या, दिशाभूल करणाऱ्या, काही भागांची भर घालून त्यासकट सबंध आराखड्यालाच नवीन वळण द्यावे असा आहे. त्यातून जे निष्पन्न होईल ते कवींना पूर्वीच्या विवेचनापेक्षा अधिक उपयुक्त होण्याची शक्यता आहे अशी आशा वाटते.

पूर्वीच्या विवेचनात मुख्य दोष असा राहिला होता की, ज्याला यथार्थपणे 'काव्यात्म' म्हणता येईल अशा कोणत्याही अनुभवातले अंतर्गत संबंध पुरेसे स्पष्ट केले गेले नव्हते. त्याचप्रमाणे त्या अनुभवाची दुसऱ्या अनुभवावर जी अवलंबने असतात त्यांचे बाहुल्य आणि त्यांच्या गुंतागुंतीही स्पष्ट करण्यात आल्या नव्हत्या. आपल्या 'बौद्धिक' आणि 'कृतिप्रवण अथवा भावनात्मक' प्रवाहांमधल्या असंख्य परस्पर-संबंधांचा त्या लेखात उल्लेख आहे आणि त्यांचे विभाजन म्हणजे विवेचकाने अवलंबिलेली एक क्लृप्ती ह्यापेक्षा अधिक काही नाही असेही त्यात म्हटले आहे हे खरे आहे. पण त्या विवरणाचा एकूण आराखडा ह्या परस्पर-प्रभावांची पुरेशी ओळख पटण्याला विरोध करणारा आहे. ही चूक सुधारण्याचा मला आता प्रयत्न केला पाहिजे.

आपण अगदी सहजपणे कवितेच्या 'भागां'बद्दल बोलतो. असा भागांचा उल्लेख करून ज्याच्याशी आपण बोलत असतो त्याच्यासमोर ज्यासंबंधी आपण बोलत असतो त्याबाबत किती वेगवेगळे पर्याय ठेवीत असतो ह्याची आपल्याला फारच अंधुक आणि दूरान्वित जाणीव असते. कवितेच्या ओळी हे तिचे 'भाग' असतात. तिच्यातली गृहीते (assumptions), तिच्यातले ध्वनितार्थ (implications), तिच्यातले सूचितार्थ (suggestions), प्रतिध्वनी (echoes), शब्द, अक्षरे, स्वल्प-विराम हे देखील तिचे भागच असतात. पण किती वेगवेगळ्या प्रकारांनी!* आणि पुष्कळ वेळा वेगवेगळ्या भागांचे परस्पर-संबंध हेही तिचे 'भाग'च असतात. एका ओळीची लांबी दुसऱ्या ओळीच्या लांबीवर अवलंबून असेल (एखाद्या मापाने मोजून ठरणाऱ्या लांबीपेक्षा अगदी वेगळ्या अर्थाने). एका खंडाचे (foot) स्वरूप इतर प्रत्यक्ष किंवा संभाव्य खंडांवर (feet) अवलंबून असते. ध्वनिसाम्याचे (assonance) कार्य ते संपूर्ण यमक नसल्याने होत असते. भाववृत्तीच्या बदलासाठी पूर्ववर्ती अशी भाववृत्ती असावी लागते. त्याचप्रमाणे कधी अपेक्षित नसल्यामुळेच शब्द प्रभावी ठरण्याचा संभव असतो तर कधी नेमका अपेक्षित असल्यामुळेच आश्चर्य-कारकपणे प्रभावी ठरेल. अशा प्रकारचे डावपेच आणि क्लृप्त्या सर्वच भाषाव्यवहारांत नेहमी आणि नाना प्रकारांनी वापरल्या जातात. भाषेचा 'काव्यात्म' उपयोग म्हणजे काय ह्याची एक व्यापक आणि सामान्यत: सोयिस्कर व्याख्या म्हणजे ज्या प्रकारच्या उपयोगांमुळे भाषि-ताची परिणामकारकता वाढते तो.

रचना करणारे लेखकाचे मन आणि पुनर्रचना करणारे वाचकाचे मन ह्या क्लृप्त्या कशा वापरतात ह्यांचा विचार करणे हे, ज्या अंत:संबंधांवर 'विज्ञान आणि काव्य' ह्या पुस्तकात पुरेसा भर दिला गेला नाही असे मला वाटते ते अंत:संबंध स्पष्ट होण्याला साहाय्यक होईल. अनुप्रास म्हणा

* पाहा *Parts and Wholes: The Hayden Colloquium on Scientific Method and Concept*, संपादक डॅनियल लर्नर, न्यूयॉर्क, द फ्री प्रेस, १९६३. रोमन जेकबसन ह्यांचे त्या पुस्तकातले विवेचन ह्या बाबतीत विशेष उपयुक्त ठरेल असे आहे. ह्या फेर-विचारात जे मुद्दे मांडले जाणार आहेत त्यांना उदाहरणे पुरवणारे म्हणून जेकबसन ह्यांच्या भाषणानंतर झालेल्या माझ्या स्वत:च्या भाषणाचाही मी समावेश करीत आहे

किंवा ध्वनिसाम्य म्हणा ह्यांच्या वापरात (आणि वाचकाने त्याच्या केलेल्या अर्थात) – तो जाणतेपणे केलेला असो, नेणतेपणे केलेला असो की, जाणतेनेणतेपणे केलेला असो – आपण सामान्यतः समजतो त्यापेक्षा किती तरी अधिक प्रमाणात संरचनेची (structure) जाणीव शिरलेली असतेच. ह्या संरचना सामान्यतः चक्राकार, कोलरिजचा * शब्द उसना घ्यायचा तर [पाण्यातल्या] भोवऱ्यासारख्या असतात. पुष्कळदा ते भोवऱ्यातून निघालेले भोवरे असतात. प्रत्येक उपघटकामध्ये (sub-component) पुढल्याला प्रेरणा देणारी (feed-forward) आणि मागल्याला निवेदन करणारी (feed-back) आदानप्रदानात्मक परस्परावलंबी गुणवैशिष्टचे असतात. म्हणजे जे घडलेले असते त्याने पुढे घडणाऱ्याचे मार्गदर्शन केलेले असते (fed forward) [आणि] आवश्यक असेल तर दोषनिवारक क्रिया करता यावी म्हणून विशिष्ट ठिकाणी घडलेली, संवादी (accordant) किंवा तदितर, घटना उपचक्राला (sub-cycle) आधारभूत असलेल्या मोठ्या यंत्रणेकडे निवेदिली जाते (fed back).

नुसत्या हाताने वर्तुळ काढणे हे कदाचित पुढल्याला मार्गदर्शन आणि मागल्याला निवेदन ह्या चक्रगतीचे (feed-forward feed-back cycle) एक अगदी चपखल उदाहरण होऊ शकेल.† ह्यातली अगदी पहिली क्रिया म्हणजे वर्तुळाचा आकार काय असावा हे ठरवणारा मार्गदर्शक आदेश (feed-forward direction). त्यावाचून वर्तुळ काढण्याला आरंभच होऊ शकत नाही. नंतर तुमच्या हातातला खडू जसा इंचाइंचाने पुढे सरकत जातो तसे मार्गदर्शक आदेशाचा भंग झाला असेल तर [वर्तुळ काढण्यात] क्रियाशील असलेल्या तुमच्या मज्जातंतू-स्नायू-स्नायुबंध-सांधे ह्यांना कळवले जाते (feed-back reporting) आणि आवश्यक असेल तर चूक सुधारणारा नवीन संदेश दिला जातो (feed-forward). आता कल्पना करा: तुमच्या हाताची जी मुक्त पण नियंत्रित गती आहे तिला साहाय्यक असणारे सगळे – दिशा चुकते का हे दक्षतेने पाहणारा तुमचा डोळा, खांदा, कोपर, मनगट, तसेच

* 'Dejection', ओळ १३६, "Their life the eddying of her living soul."
† पाहा *English Through Pictures*, पुस्तक २, न्यूयॉर्क, पॉकेट बुक्स, पृ. २२९२.

अंगठ्याचे आणि बोटांचे सांधे इत्यादींना वळवणाऱ्या स्नायूंच्या परस्पर-विरोधी ताणांचा तोल सांभाळणारे मज्जातंतू, हे सर्व – एका परस्पर-साहाय्यक परिपथामध्ये (circuit) संघटित झालेले आहेत. ह्या परिपथात जे लहान उपघटक आहेत ते देखील, ज्या एका मोठ्या यंत्रणेचे ते कार्य साधीत आहेत तिच्यावर अवलंबून असल्यामुळे, स्थिर राखल्या गेलेल्या चक्रगति-यंत्रणा (cycle systems) आहेत असेही आपल्याला मानता येईल.

ह्या एकूण व्यवस्थेतली सहज लक्षात येणारी एक गोष्ट म्हणजे तिच्यात पर्याय-योजनेला (substitution)* असलेला अमर्याद वाव. तिच्यात अनेक पर्यायी साधने उपलब्ध आहेत. वर्तुळाच्या वक्रतेत सुधारणा करायची झाली तर ती तुम्हाला खांद्याचे, कोपराचे, किंवा मनगटाचे किंवा वेगवेगळ्या प्रमाणात तिघांचेही वळण बदलून करता येईल. जर काही कारणाने एका पद्धतीने हे करता आले नाही तर दुसऱ्या एखाद्या पद्धतीने करता येईल. ही गोष्ट जीवशास्त्रदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे हे उघड आहे. पण (शक्य होईल त्या प्रमाणात) विचार करण्याजोगा प्रश्न हा आहे की, ह्या पर्यायांची निवड कशी केली जाते? त्यांना तयार राहण्याच्या सूचना कशा दिल्या जातात? आणि त्यांचा पूर्वापार क्रम, त्यांचे मीलन, वगैरेंचे व्यवस्थापन कसे केले जाते? त्यासाठी ह्या मोठ्या यंत्रणेत आडव्या-उभ्या, लहान-मोठ्या अशा अनेक नियंत्रण-योजनांच्या श्रेणी असल्या पाहिजेत आणि ह्या सर्वात ज्या उपयंत्रणा असतील त्यात परस्पर-निवेदनाची, कदाचित विविध-प्रकारची, काही तरी व्यवस्था असली पाहिजे. हा सगळा, अर्थात, आज तरी (१९७०) केवळ तर्काचा खेळच आहे. पण अलीकडे काही वर्षांत ह्या बाबतीत इतक्या अनपेक्षित अशा झपाट्याने प्रगती झाली आहे, आणि मज्जातंतुव्यवस्थेच्या प्रतिमानांनी (model designs) अशी आशा निर्माण केली आहे की, मानवाच्या बीजरूप सामर्थ्यावर नवीन, आणि कदाचित, बंधविमोचक प्रकाश लवकरच पडेल असे वाटते.

---

* जेव्हा अनेक स्वतंत्र समांतर (parallel) परिपथ एकमेकांशी एकाच वेळी सहकार्य करीत असतात तेव्हा चूक सुधारण्याला किती वाव उपलब्ध असतो हा प्रश्न आहे. त्याकडे फॉन नॉयमान ह्यांनी लक्ष वेधले आहे.

मन-मेंदू (mind-brain) ही एक गणकयंत्राशी समरूप (parallel) अशी वस्तु आहे असे आजच म्हणणे अकाली आणि कदाचित वेडेपणाचे होईल ह्यात शंका नाही. पण त्या दोहोंत इतका सारखेपणा आहे की, मन जें काही करते ते ते कसे करू शकते ह्याची कल्पना आता आपण पूर्वीपेक्षा किती तरी अधिक संयुक्तिकपणे करू शकतो. आणि ह्या क्रिया खरोखरच किती नैसर्गिकातीत (preter-natural) – म्हणजे 'नैसर्गिक' ह्यासंबंधीची आपली जी पूर्वी कल्पना होती तिच्या अतीत ह्या अर्थाने – आहेत ह्याचीही कल्पना करू शकतो.

काही काव्यांमध्ये ह्या नैसर्गिकातीताची अत्यंत आत्मवर्ती (reflexive) आणि आत्मसंबद्ध (self-involved) अशी उदाहरणे आढळतात. तीं स्वतःच स्वतःचे संस्करण - संपादन करतात. काही वेळा इतके की मनोव्यापार-पटाचें (mental spectrum) दुसरे टोक जे गणित त्याच्याशी त्याची तुलना होऊ शकेल. मात्र आत्मसंदर्भाच्या आणि आत्मपरीक्षणाच्या त्यांच्या पद्धती अगदी भिन्न आहेत. गणित स्वतःचा शोध गणिताच्या साधनांनी करते. काव्ये काव्याच्या साधनांनी करतात. काव्याची रचना करीत असताना, किंवा काव्याच्या वेगवेगळ्या अर्थांतून निवड करताना एका घटकात बदल केला तर इतर घटकांत किती मर्यादेपर्यंत बदल करणे भाग पडते – 'अ' मध्ये बदल झाला तर 'आ' आणि 'ई' मध्ये देखील बदल झालाच पाहिजे – हे लक्षात घेऊन आपण काय करायचे ते ठरवतो. इथेच आपल्याला काव्य आत्मशोध कसे करते ते दिसून येते. एका घटकातल्या बदलांचे इतर घटकांवर होणारे अपरिहार्य परिणाम, उपलब्ध पर्यायांचे परस्परस्पर्धी परिणाम, आपल्याला त्यांचे वजन तोलण्याला भाग पाडतात. रचनेची प्रक्रिया म्हणजे खरोखर ह्या परिणामांची वजने तोलणेच आहे. माझे म्हणणे असे आहे की, वर्तुळ काढण्याच्या प्रक्रियेतल्या प्रमाणेच ह्या प्रक्रियेत देखील, सामान्यपणे ज्या पर्यायांची आपल्याला अल्पशी देखील जाणीव असल्याचे आपण मान्य करीत नाही त्या पर्यायांचा समावेश करावा.

'आपल्या'ला ह्या पर्यायांची जाणीव नसते. पण कवितेच्या रचनेला, तिच्या वाढीला, त्यांची जाणीव असते. आणि 'आपल्या'-तलेच काही तरी ह्या असंख्य परिणामांची (entailments) –

सहकारांची आणि नकारांची—नि:शंकपणे आणि पक्केपणी दखल घेते.

अशा वाक्यांत कोणते 'आपण' बोलत असू हे ठरवणे ही सोपी गोष्ट नाही. एक संभाव्य उत्तर असे दिसते की, अशा वाक्यांतले 'आपण' म्हणजे मागल्याला केलेल्या निवेदनाने (feed-back) त्या त्या वेळी संमत केली जात असलेली उचित अशी पुढली क्रियापद्धती (feed-forward). आपल्यातले 'आपण' सतत बदलत असतो ही जी सर्वमान्य वस्तुस्थिती आहे तिच्याशी हे उत्तर सुसंगत आहे. कवितेच्या रचनेच्या किंवा तिचा अर्थ लावण्याच्या कार्यात गुंतलेले 'आपण' अंगीकृत कार्याशी अत्यंत निकटपणे बांधले गेले असल्याचे दिसून येते. त्या मानाने पाढयांच्या ज्ञानाचा उपयोग करणारे 'आपण' त्यात जवळजवळ मुळीच गुंतलेले नसतो. पण हे दोघेही 'आपण' कोणत्याही चरित्रलेखकाला कधीच उमगणार नाही अशा एका मोठया 'आपण' चे भाग असतो.

मी सुचवल्याप्रमाणे 'आपल्या' ला ज्यांची जाणीव नाही (पण कवितेला ज्यांची जाणीव आहे) अशा प्रभावी पर्यायांचा आपण कवितेत समावेश केला तर, बहुतेक काव्ये आपल्या ठिकाणी जी गूढता (mystery) असल्याचा रास्त दावा करताना दिसतात ती गूढता त्या कवितेला पुन्हा प्राप्त होण्याची शक्यता आहे. कवितेसंबंधी आपल्याला जितकी माहिती असते त्यापेक्षा तिला स्वत:ला अधिक माहिती असते. आणि ह्या गोष्टीची आपल्याला जाणीव करून देणे हे तिच्या कार्याचा एक भाग आहे. कवितेसंबंधी हा दृष्टिकोण स्वीकारला तर, कविता म्हणजे 'अनुभवाचा वेचक तुकडा' (a choice piece of experience) अशी जी पदवी (status) तिला 'विज्ञान आणि काव्य' ह्या पुस्तकात दिली गेली होती असे मला वाटते तिच्यापासून तिची सुटका होईल अशी मला आशा वाटते. ह्या दृष्टिकोणाचे Vulgar Packaging View असे वर्णन करून त्याचा 'The Future of Poetry' मध्ये [मी] चांगलाच धिक्कार केला आहे. (*The Screens and Others Poems*) ची पुरवणी आणि (*So Much Nearer*) मध्ये पुनर्मुद्रित (Harcourt, Brace & World, Inc., 1968). कविता ही मग एक नोंद राहात नाही, तर जिला आपली स्वत:ची विशिष्ट भूमिका पार पाडायची आहे अशा एका सत्तेचे (being) आत्मस्वरूपात व्यक्त

होणे आहे असे दिसून येते. 'आपण काय व्हावे?' (What to be?) ह्या प्रश्नाने तिची सुरुवात होते आणि जेव्हा ती यशस्वीपणे समाप्त होते तेव्हा ती ज्याच्या शोधात असते ते तिला स्वतःतच गवसलेले असते. ती आत्मनिबद्ध होते. कोलरिजचे सूत्र वापरून सांगायचे तर "ती आहे तशी का आहे आणि इतर काही का नाही ह्याचे कारण तिच्यातच असते".

ज्या अंतःसंबंधांकडे 'विज्ञान आणि काव्य' मध्ये दुर्लक्ष झाले होते असे मला वाटते त्यासंबंधी आतापर्यंत सांगितले. इतर संबंध–जे घडले ते आणि जे घडणार आहे ते ह्यांना जोडणारे, तसेच निवड करणारे आणि चुका सुधारणारे दुवे–ह्यांकडेही, मी अन्याय करीत नसेन तर, मला वाटते [त्या पुस्तकात] दुर्लक्षच झाले. धर्माच्या पिछेहाटीचा वेग वाढवण्यात फार गुंतल्यामुळे त्या पुस्तकाला स्वतःच्या उद्देशाकडे लक्ष द्यायला बहुधा फुरसत मिळाली नसावी.

मूल्यांचा शोध, पुनःपरीक्षण आणि दृढीकरण करण्याचे कार्य काव्यांना ह्या ज्या इतर संबंधांच्या द्वारा करणे शक्य होत असते ते संबंध एखाद्या चांगल्या कोशाच्या कार्याकडे पाहिले तर कदाचित थोडक्यात समजू शकतील. प्रत्येक शब्दाच्या प्रत्येक उपयोगाचा इतर सर्व शब्दांच्या उपयोगाशी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष संबंध असल्याचे तिथे दिसून येईल. इथे 'उपयोग' ह्या शब्दाचा काळजीपूर्वक विचार करणे आवश्यक आहे. शब्दाचा 'उपयोग' ह्याचा अर्थ, (इतर शब्दांच्या सहकार्याने) त्याला जे कार्य करायला सांगितलेले असते, जे कार्य करण्यात त्याला इतरांना साहाय्य करायचे असते, ते. आपण स्वतःला काही गोष्टींची पुन्हा आठवण करून देऊ या : (१) आपण शब्दांना ज्या कार्यात सहभागी व्हायला सांगत असतो ते म्हणजे प्रसंगांना यशस्वीपणे तोंड देण्याचा प्रयत्न करणे; आणि (२) हे प्रसंग म्हणजे अशा गुंतागुंती असतात की, त्यात जे काही कार्य करायचे असते त्याचे बोलणारा आणि ऐकणारा हे, त्या कार्याबरोबरच आणि त्यात गुंतलेले असे, आवश्यक आणि मूलभूत भाग असतात.

भाषा माणसासाठी काय करते ह्यासंबंधीच्या विचारात ह्या सर्व गोष्टी सामान्यतः गृहीतच धरल्या जातात. पण हेच जर अधिक सविस्तरपणे मांडले गेले आणि त्यावर कल्पकतापूर्वक विचार झाला तर– सर्जनशील कार्यात योग्य प्रकारे वापरली गेलेली भाषा ह्या अर्थाने–

काव्याचे ते समर्थन होऊ शकेल असे मला वाटते. ते कुठे शोधावे ह्याची नेमकी जाणीव "विज्ञान आणि काव्य" च्या लेखकाला नव्हती. मात्र त्याचा सतत शोध घेत राहिले पाहिजे ह्याची जाणीव त्याला होती.

'सर्जनशील' ह्या शब्दाच्या, मूर्खपणाने केल्या गेलेल्या, काही उपयोगांमुळे तो घाबरला असावा, आणि त्यामुळे त्या शब्दाचे इतर उपयोग करण्याला तो कदाचित धजला नसावा.

तू स्वतःला घडवू शकतोस का ? ते सांग.--आधी ते काम शीक;—
तू स्वतः काय केले आहेस ते कदाचित तुला कळेल.

(Say can'st thou make thyself ?—Learn first that trade;—
Haply thou mayst know what thyself had made.)*

कदाचित कोलरिजलाही ह्याचा अर्थ नेमका काय करावा ते कळले नसेल. भाषेने ज्या काही गोष्टी करायच्या असतात त्यांपैकी अस्तित्वाच्या उच्चतर अवस्था प्राप्त करून घेण्यात आपल्याला मदत करणे ही मुख्य गोष्ट आहे ह्याबद्दल सामान्यतः एकमत होणे शक्य आहे. पण असे असले तरी वरील विधानाचा अर्थ करण्याच्या बाबतीत फारच थोडे विचारवंत वाचक निश्चल राहतील असे वाटते. बोईथियसला तुरुंगात तत्त्वज्ञानाने म्हटले, "तुझ्या आजाराचं कारण मला आता कळलं. तू काय आहेस हे तू विसरला आहेस." तसे हे आहे.

---

*Coleridge, "*Self Knowledge.*"

# आपण समाप्त झालो हे कवितेला कसे कळते ? *

एडगर ॲलन पो पासूनच मी सुरुवात करतो. तो म्हणतो, "मला पुष्कळदा असे वाटले आहे की, आपली एखादी रचना पूर्णतेच्या अवस्थे-पर्यंत कशी पोचली ह्याच्या प्रक्रिया जर एखादा लेखक टप्प्या-टप्प्याने, तप-शीलवार सांगू इच्छील–म्हणजे जर तो सांगू शकेल–तर तो त्याचा लेख अतिशय मनोवेधक होईल" (*The Philosophy of Composition* †) जो सांगू इच्छील– म्हणजे जो सांगू शकेल ("Who would—that is to say who could.") काय करायचा ह्याचा अर्थ? असा करायचा का की, जो कोणी हे वर्णन करायला समर्थ असेल त्याला ते करायला आनंदच वाटेल ? की उलट असा करायचा की, स्वतःचे असे प्रदर्शन करणे बहुतेक कुणाला सहन होणार नाही ? पो ने पुढे जे लिहिले आहे त्यावरून त्याचा कल दुसऱ्या अर्थाकडे दिसतो.

ते कसेही असो. कदाचित ह्या बाबतीत दृष्टिकोणात बदल करण्याची आवश्यकता तर नाही ना ? मानसशास्त्राच्या ज्या पंथांचा अलीकडे काही वर्षांत खूप व्यापक प्रमाणावर प्रसार झाला आहे ते आपल्या खाजगीपणाच्या

---

* डॅनियल लर्नर ह्यांनी संपादिलेल्या *Parts and Wholes : The Hayden Colloquium on Scientific Method and Concept* ह्या ग्रंथातून द मॅकमिलन कंपनीच्या परवानगीने पुनर्मुद्रित, © द मॅसच्यूसट्स इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलजी, १९६३.

† मूळ वाक्य : "I have often thought how interesting a magazine paper might be written by an author who would — that is to say who could —detail, step by step, the processes by which one of his compositions attained its ultimate point of completion."

आवडीला काहीसे प्रतिकूल आहेत. आपली स्वत:ची मनेसुद्धा आपली स्वत:ची नसतात ही सर्वसामान्य कल्पना, आणि त्याबरोबरच मन नावाची वस्तु मुळी नाहीच हे मत, ह्या दोन गोष्टींमुळे आपण शक्य होईल तेव्हा आणि तितके स्वत:ला उघडे करण्यात रमण्याला प्रवृत्त होण्याचाच संभव अधिक. त्यानुसार माझ्या स्वत:च्याच एका कवितेने, 'आपल्या पूर्णतेचा अखेरचा टप्पा' म्हणणार नाही मी, पण [पुस्तकाच्या] पृष्ठात स्वत:ला पुरून घेण्याची तयारी होईपर्यंतचा टप्पा कसा गाठला, ह्याची थोडीशी हकीकत ह्या निबंधाच्या शेवटी दिलेली तुम्हाला आढळेल. अर्थातच त्यानंतरही आपल्याला अनेक जन्म लाभतील, वाचकांच्या मनात आपल्याला असंख्य वेळा पुनरुज्जीवन लाभेल, ही आशा तिला आहेच.

पुढे मी जे काही सांगणार किंवा गृहीत धरणार आहे त्यात *Biographia Literaria* च्या १४ व्या प्रकरणातले कोलरिजचे पुढील विधान माझे बहुतांशी मार्गदर्शक आहे. ते म्हणजे, "ज्या वस्तूंत ती आहे तशीच का आहे, त्यावेगळी का नाही, ह्याचे कारण अंतर्भूत नसेल ती वस्तू चिरंतन आनंद देऊ शकणार नाही." किंवा शेलीने आपल्या *A Defence of Poetry* ह्या निबंधाच्या पहिल्याच वाक्यात वेगळ्या शब्दात केलेले तेच विधान. "स्वत:च्या पूर्णत्वाचे तत्त्व ज्यात अंतर्भूत झाले आहे ते".

आरंभीच एक गोष्ट विचारात घेणे उपयुक्त ठरेल. ती म्हणजे बहुतेक कविता (कदाचित सगळ्याच. पण 'सगळ्या' शब्द वापरला तर आपण अवलोकन करण्याचे सोडून व्याख्या करण्याच्या मागे लागलो असे होईल म्हणून मी फक्त 'बहुतेक' असे म्हणतो) आरंभीच स्वत:पुढे एक समस्या उभी करतात. ती सोडवली जाणे, बाजूला सारली जाणे, किंवा विखुरली जाणे म्हणजेच तिला पूर्णत्व येणे : जी पूर्णावस्था आपल्याला विवक्षित आहे ती पूर्णावस्था प्राप्त होणे. चांगल्या कवितांत तसे होतेही. कवितेच्या पूर्णावस्थेच्या आधीचे जे टप्पे असतात ते पूर्णावस्थेशी (म्हणजे कवितेचा शेवट आणि प्रयोजन ह्यांच्याशी) संबंधित असे भाग असतात. कवितांच्या वेगवेगळ्या उदाहरणांत हे टप्पे कालदृष्टचा किंवा तर्कदृष्टचा किंवा मानसदृष्टचा किंवा उद्दिष्टदृष्टचा पूर्ववर्ती असतात.

कविता स्वत:पुढे ज्या समस्या उभ्या करतात त्यांसंबंधी आपण आताच फार नेमके बोलण्याचा प्रयत्न न करणे बरे. ह्या समस्या त्यांची विशिष्ट प्रकृती, व्याप्ती, महत्त्व आणि नेमकेपणा ह्या दृष्टींनी अनेक प्रकारच्या असतील अशी अपेक्षा करायला हरकत नाही. ह्यापैकी काही तुलनात्मकदृष्ट्या साध्या असतात; काही गुंतागुंतीच्या.

हाताने वर्तुळ काढणे हे साध्या आणि नेमक्या समस्येचे एक नमुनेदार उदाहरण आहे असे मला वाटते. एकतेचा तो अगदी हाताशी असलेला नमुना आहे. हाताने वर्तुळ काढण्याची क्रिया अगदी आरंभीच – परिघाचा पहिला मिलिमिटर काढला जाण्याच्या आतच – स्वत:ची मर्यादा स्वत:च स्पष्ट करून घेते. आणि त्याबरोबरच उरलेली सगळी क्रिया, तिच्या यशस्वितेच्या कसोटचा आणि वर्तुळ संपूर्ण होण्याचे नक्की स्थान ह्या सर्व गोष्टी अनन्यपणे आधीच निर्णीत होतात.

एखादी कविता स्वत:पुढे उभी करू शकेल अशी सोप्यात सोपी समस्या म्हणजे तिची वाढ होऊ देईल अशी एखादी घटना शोधून काढणे किंवा निर्माण करणे. मी इतक्या लवकर 'वाढ' हा शब्द वापरला त्याचे कारण म्हणजे मला असे खोलपणे जाणवू लागले आहे की, जीवशास्त्रीय, सेंद्रिय, प्राणिशास्त्रीय किंवा अधिक नेमकेपणे सांगायचे तर गर्भवृद्धिशास्त्रीय उदाहरणेच ह्या विषयात सर्वात अधिक उपयोगी पडू शकतील.

गर्भापुढे असलेल्या एकूण समस्येचे वर्णन, फार प्राचीन काळी, स्तोत्रकाराने (Psalmist) स्वत: तिचे उत्तर देतादेताच करून ठेवले आहे :

माझा देह अपूर्ण असतानाच त्यात काय आहे
ते तू पाहिलेस ; आणि
तुझ्या पुस्तकात माझ्या सगळ्या अवयवांची नोंद झालेली होती;
जेव्हा त्यांच्यापैकी एकही नव्हता :
तेव्हासुद्धा दिवसागणिक त्यांना आकार येत होता.
(Thine eyes did see my substance
yet being unperfect ;
And in thy book were all my members written ;
Which day by day were fashioned :
When as yet there was none of them.)

"When as yet there was none of them" अशा परिस्थितीत, शेवटी त्यांना जे काही व्हायचे असते ते होत असताना आपण पुढल्या क्षणी काय व्हावे हे त्यांना कसे कळते ? ही गर्भापुढची समस्या आहे. तिचे उत्तर एखाद्या पुस्तकात लिहून ठेवलेला एक नियमबंध, यादी, सूचनांचा क्रम, आदेश ह्यांच्याशी तुलना करून देता येण्यासारखे आहे. हे काही खरोखर चांगले उत्तर नाही, नाही का ? कारण, पुस्तकात दिलेला सूचनांचा क्रम, आदेश (किंवा उदाहरणार्थ, कविता) ह्यांना शेवटी जे काही व्हायचे असते ते होत असताना पुढच्या क्षणी आपण काय झाले पाहिजे हे कसे कळते ? असा प्रश्न जर आपण विचारला तर मूळचाच प्रश्न पुन्हा उभा राहतो.

गुणसूत्रांच्या नृत्याचे (chromosome dance) कार्य कसे चालते हे आपल्याला कमी-अधिक मानाने कळू शकेल इतपत त्यासंबंधीचे ज्ञान आपल्याला होऊ लागले आहे असे म्हणतात. त्यासंबंधी आपल्याला जेवढे ज्ञान असणे आवश्यक आहे तेवढे सगळे ज्ञान आपल्याला पुढेमागे मिळेल अशीही अपेक्षा करायला हरकत नाही. पण "कविता कशी वाढते? आपण 'आपण'च कसे व्हावे हे ती कसे शिकते ? आपण समाप्त झालो हे तिला कसे कळते ?" ह्या आपल्या प्रश्नांचे समाधानकारक उत्तर मिळण्यासाठी शब्दांचे नृत्य आणि त्या नृत्यामागची नृत्ये ह्यासंबंधी आवश्यक असलेले ज्ञान जवळपास पुरेसे मिळण्याला मात्र त्यामानाने बराच अधिक काळ लागेल.

ह्या प्रश्नाची अशा रीतीने मांडणी करणे म्हणजे चेतनोक्ती (Pathetic Fallacy) आहे असे मला वाटत नाही हे जाता जाता सांगून ठेवतो. ह्या भाषणासंबंधीची सूचना फलकावर लागल्याबरोबर माझे एक मित्र मला म्हणाले, "चर्चाविषयाच्या मथळ्यातच अचेतनावर भावनारोप (पॅथेटिक फॅलसी) करणारे तुम्ही खूपच धीट गृहस्थ आहा." पण कवितांमध्ये पूर्णपणे नसलेली अशी कोणतीच गोष्ट मी मथळ्यात त्यांच्यावर लादलेली नाही. त्या स्वभावतःच जिवंत, संवेदनक्षम आणि सजाण अशा वस्तू आहेत. कवितेला सेंद्रिय मानणारे रूपक हे रूपक नाहीच. ते तिचे वाच्यार्थाने वर्णन आहे. कविता ही आपले स्वतःचे रूप प्राप्त

करून घेण्याचा प्रयत्न करणारी एक क्रिया आहे. सजीव वस्तूंची सर्व वर्तणूक ('हालचाल' हा शब्द मला अधिक योग्य वाटतो. पाहा. *Speculative Instruments*, pp. 118–22) इंद्रियसंबद्ध (organic) असते. मात्र ती खऱ्या अर्थाने 'हालचाल' [कृती] असली पाहिजे. जिन्यावरून खाली पडणे ही 'हालचाल' नव्हे. जिना चढणे ही [हालचाल] आहे.

कविता, पुस्तक, मते वगैरे काही अंशी स्वतःची जबाबदारी जाणणारी असतात, आपण काय करायचे ते ती आपणच ठरवतात आणि आपल्या चुकांचा भूर्दण्ड आपणच भरतात हा विचार अति ताणला जाणे शक्य आहे. *Tractatus Logico-Philosophicus* मध्ये दोन-तीन प्रमाद असल्याचे, तो ग्रंथ प्रकाशित झाल्यानंतर काही दिवसांनी, व्हिट्‌ग्न-स्टाइनने मला सांगितल्याचे आठवते. (त्या चुका भाषांतराच्या नव्हत्या. त्याची त्याबद्दल तक्रार नव्हती. तर मूळ विचारातल्याच होत्या.) मी सरळ भावाने म्हटले, "ठीक आहे. एक शुद्धिपत्र त्यात घाल आणि दुसऱ्या आवृत्तीत चुका सुधार." त्याबरोबर, समाजाचा आधारस्तंभच अशा प्रतिष्ठित गृहस्थाने नुकताच ज्याचा विश्वासघातकीपणा उघडकीला आला आहे अशा माणसाकडे पाहावे तसा तो माझ्याकडे पाहू लागला आणि म्हणाला, "ते कसं शक्य आहे ? ते माझं मूल आहे ? त्याचा खून मी कसा करू शकेन ?" वगैरे वगैरे.

आता आपण आपल्या खास प्रश्नाकडे येऊ. 'बाप' हा शब्द घ्या. ह्याचे कार्य कसे चालते ? 'आई' आणि 'मूल' ह्या दोन दुसऱ्या शब्दांशी असलेल्या त्याच्या विरोध आणि सहकार्य अशा संबंधव्यवस्थेच्या द्वारे चालते.

शब्दांचे परस्परावलंबन दाखवण्यासाठी जितके उघड दिसणारे उदाहरण मला निवडता आले तितके मी निवडले आहे. ('केन्द्र', 'परीघ', 'वर्तुळ' हे दुसरे उदाहरण होऊ शकेल.) ह्याच्या जोडीला जर मी 'पति', 'पत्नी', 'कुटुंब' ह्या शब्दांची भर घातली तर अर्थातच ह्या बदलामुळे शब्दांची परस्परावलंबने अमर्यादपणे विस्तार पावली आहेत असे आपल्याला दिसून येईल. शरीरक्रियाशास्त्राकडून आपण एकदम अर्थातच समाजशास्त्राकडे आलो आहो.

मी आताच 'अर्थातच' (of course) हा शब्द वापरला. 'अर्थातच' ह्या शब्दाचे पुढीलप्रमाणे अर्थ होऊ शकतात हे अर्थातच, आपल्याला माहीत आहे :

(१) विनम्रपणाचा छोटासा हावभाव. आपण बुद्धिमान आहोत ह्या श्रोत्यांच्या स्वतःबद्दलच्या भावनेला मान्यता.

(२) एक आक्रमक बजावणी : 'हिंमत असेल तर मला विरोध करा.'

(३) भीतीपासून बचाव करून घेण्यासाठी स्वतःला आश्वासन, किंवा आणखी इतर अनेक गोष्टी. (संदर्भ, विरोध आणि सहकार्य ह्या संबंधांचे तत्कालीन कार्य, ह्या बाबतीत) 'अर्थातच' बरोबर कार्यशील असणाऱ्या इतर शब्दांवर त्या अवलंबून राहतील.

शब्दांमधले हे विरोध आणि ही सहकार्ये ह्यांची असंख्य उदाहरणे आपल्यापैकी कोणीही देऊ शकेल. कोणत्याही चर्चेमध्ये अशी उदाहरणे असंख्य आणि अपरिहार्यपणे दाखवता येतील. ह्या ठिकाणी मी आपल्याला दोन गोष्टींची आठवण करून देऊ इच्छितो.

(१) कोणत्याही भाषाव्यवहारामध्ये ह्या सहकार्यांचा आणि विरोधांचा पुढील गोष्टींशी संबंध असतो;

(व) बोलण्याचा विषय काय आहे ?

(स) त्यासंबंधी काय सांगितले आहे ?

(अ) व आणि स पासून आपण किती अंतरावर आहो ?

(म) हे अंतर लक्षात घेता आपण $\frac{\text{व, स}}{\text{अ}}$ चे मूल्य (+किंवा –) काय मानतो ? पण पुढे काय ?

(ह) आपले रूप प्राप्त करून घेण्याचा आणि स्वतःला पुढे नेण्याचा प्रयत्न करणारी कवितेतली जी सहेतुक क्रिया ह्या विकासाच्या केन्द्रस्थानी असते तिचा परिणाम म्हणून,

(ज) एखादी वस्तू आपण आपल्याशी कशी जुळवून घेऊ आणि/किंवा तिच्याशी आपण आपल्याला कसे जुळवून घेऊ ? [आणि]

(घ) तिच्या [त्या सहेतुक क्रियेच्या] पूर्तीसाठी आपण ह्या सगळ्यांची संघटना कशी करू ? [ह्याच्याशीही त्याचा संबंध असतो]

ज्या सहकार्यांमुळे आणि विरोधांमुळे कोणत्याही उद्‌गाराला त्याचे स्वत:चे रूप प्राप्त होते, तो जे करतो ते करतो, त्यांच्या द्वाराच (त्याचे) उद्दिष्ट साधत राहते.*




(२) दुसऱ्या ज्या गोष्टीची मला आपल्याला आठवण करून द्यायची आहे ती ही की, केवळ वापरलेल्याच शब्दांच्या द्वारा भाषा आपले कार्य करते असे नाही तर न वापरलेल्या शब्दांच्या द्वारादेखील करते. एका प्रसंगी रस्किन संतापून म्हणाला होता, "जे शब्द माझ्या ओठांवर आलेले आहेत ते मी वापरणार नाही." कविता अनेक मार्गांनी ही गोष्ट नेहमी करीत असतात. कवितेमध्ये यमकांचा संच, न वापरलेले पर्याय, 'धातु-साधक प्रत्यय' (root-forming morphemes) (*Interpretations in Teaching*, pp.241–45) इत्यादी योजलेल्या किंवा

---

* इथे जे चित्र दिले आहे त्याचा 'यंत्रा' सारखा उपयोग होऊ शकेल. हिंदू उपासनापरंपरेत उपासनेच्या साधनासाठी वापरलेली 'यंत्र' ही व्यापक अर्थाची संज्ञा आहे. उदा. मूर्ती, चित्रे भूमितीय आकृती··········मनातील इष्ट कल्पनादृश्याच्या (vision) क्रमवार विकासाला साहाय्यक असा, एक प्रकारचा नकाशा किंवा वेळापत्रक म्हणून 'यंत्राचा' उपयोग होऊ शकेल. Heinrich Zimmern, *Myths and Symbols in Indian Art and Civilization*, pp. 140-141.

वगळलेल्या पण संभाव्य अशा नाना प्रकारच्या परस्पर क्रिया-प्रतिक्रियांच्या द्वारा हे घडत असते. मुळीच वापरल्या न गेलेल्या शब्दांमध्ये अमर्याद असे सहकार्य-विरोध-संबंध असतात. वाढत असलेल्या कवितेला ते सहकार्य-विरोध-संबंध सर्व अंगांनी आकार देत असतात, मुरड घालीत असतात, तिच्या हालचालीला वळण लावीत असतात, मार्ग दाखवीत असतात, तिला जे रूप मिळायचे असते ते रूप मिळण्याला साहाय्य करीत असतात, आणि तिला ज्या क्षणी ईप्सित रूप प्राप्त होते – जर झालेच तर – त्या क्षणी तिला तसे बजावून सांगतात.*

मी आता थोडक्यात आणि जराशा आग्रहाने बोलू का? चरित्र-विषय म्हणून कवीसंबंधीच्या आस्थेला अलीकडे फार मोठ्या प्रमाणावर गैरवळण लागल्यामुळे, अनेकांची अशी समजूत झाली आहे की (कवीच्या) कविता त्याच्या अनुभवातल्या काही बाबी, घटना, प्रसंग, पेचप्रसंग वगैरे फक्त अभिव्यक्त करीत असतात. आणि ह्या ठिकाणी 'अनुभव' ह्याचा अर्थ कवितेच्या वाढीची कल्पनानिष्ठ, संश्लेषणात्मक क्रिया असा नसतो, तर कवीच्या दैनंदिन जीवनाचा एखादा अंश असा असतो. त्याने काय पाहिले, त्याला काय वाटले, तो कोणत्या प्रसंगातून गेला, त्याने काय केले, त्याच्या बाबतीत काय घडले, वगैरे वगैरे. असे कधीच नसते असे मी म्हणणार नाही (तसे म्हणणे म्हणजे पुन्हा आपण व्याख्या-व्यापाराच्या मागे लपण्यासारखे होईल). मी एवढेच म्हणेन की, आपण जर खरोखरच ह्या प्रकारच्या प्रश्नांची चर्चा करीत असू तर आपल्याला ज्या प्रकारचा पुरावा हवा आहे त्या प्रकारचा पुरावा आपल्याला सहसा आढळणार नाही.

उपलब्ध पुरावा पाहता अधिक सामान्यपणे असे घडते की – मी आरंभी म्हटल्याप्रमाणे – कविता सुरुवातीलाच स्वतःपुढे एक प्रश्न किंवा एक समस्या उभी करते. मी असे म्हटले की, सगळ्यात साधा प्रश्न

---

* भाषेच्या ह्या विविध कार्यांच्या आणि कामगिऱ्यांच्या अधिक सविस्तर विवेचनासाठी कोणत्या अर्थांनी आणि किती प्रकारांनी उद्गार परस्परांपासून वेगळे असू शकतात हे पाहण्यासाठी, *Speculative Instruments* मधील "Towards a Theory of Comprehending" हे दुसरे प्रकरण पाहा. Sense, Feeling, Tone आणि Intention ह्यांच्या संदर्भात *Practical Criticism* (पृ. १८०–८८, ३५३–५७) मध्ये जी चर्चा केलेली आहे तिच्याशी हे विश्लेषण विरोधी नसून तिला पूरक आहे हे स्पष्ट होईल.

किंवा समस्या म्हणजे तिच्या वाढीला साहाय्य करू शकेल असा एखादा प्रसंग – कल्पनानिष्ठ शक्यतांचा संच – शोधून काढणे किंवा निर्माण करणे. हा प्रसंग – हा शक्यतांचा संच – म्हणजे शब्दांमधल्या विरोधांचा आणि सहकार्याचा व्यूह असतो. थोडक्यात सांगायचे म्हणजे कवितेचा आरंभ एका भाषिक समस्येच्या निर्मितीने होतो आणि ती भाषेच्याच साहाय्याने सुटली म्हणजे तिची इष्टसिद्धी होते.

कवितेच्या ह्या समस्येची दुसऱ्या दोन समस्यांशी तुलना करून आणि तिचा वेगळेपणा निःसंदिग्धपणे दाखवून मी तिचे खास भाषिक स्वरूप अधिक स्पष्ट करू शकेन. त्यांपैकी एक म्हणजे आताच ज्यांचा उल्लेख केला त्या चरित्रविषयक समस्या, आणि दुसरी म्हणजे कवितेच्या प्रकारा-संबंधीच्या साहित्यिक किंवा ऐतिहासिक समस्या, किंवा पूर्ववर्ती कवितांशी असलेल्या तिच्या संबंधांविषयीच्या समस्या. उदाहरणादाखल घेतलेल्या एखाद्या कवितेत शक्य त्या सर्व समस्या कितीही परस्परसंबद्ध असल्या तरी त्यांमधला हा वेगळेपणा राहतोच. अवलोकनाच्या आणि/अथवा अटकळीच्या एका क्षेत्राकडून दुसऱ्या क्षेत्राकडे आपण वळलो की, पद्धती, आवश्यक असलेल्या संकल्पना, स्वीकाराव्या लागलेल्या लक्ष्याची दिशा आणि केन्द्र, स्वीकार्य होऊ शकतील असे मानदंड, बदलतात. कवीच्या जीवनातल्या कोणत्या घटनेने कवितेतल्या कोणत्या घटनेला आकार दिला असावा ह्यासंबंधीच्या चरित्राधारित तर्काची संभाव्यता – सध्या, आणि बहुधा नेहमीच – अनिश्चितच असणार. चरित्रदृष्ट्या महत्त्वाच्या अशा एखाद्या प्रसंगी प्रत्यक्ष वापरण्यात आले असे सांगण्यात आलेले शब्द-साहित्य जरी कवितेत वापरले असले तरी त्या प्रसंगाने ती कविता कोणत्याही खोल अर्थाने 'निर्णीत' केली असे आपण समजणे धाडसाचे होईल. चांगल्या प्रतीच्या गुप्त पोलिसी कथा वाचणाऱ्या कोणाही जाणत्या वाचकाला ह्या भाबड्या विचारसरणीचे हसूच येईल. प्रत्यक्ष जीवनात वेगळ्याच संदर्भात घडलेली एखादी घटना कविता केवळ स्वतःचा हेतू साधण्यासाठी वापरीत असेल. पण चरित्रनिष्ठ टीकालेखकांत ही सावधगिरी घेतलेली क्वचितच दिसून येते. त्यांनी केलेल्या कष्टांमुळे त्यांना मिळालेल्या माहितीला अवास्तव महत्त्व देण्याकडे त्यांचा कल होत असावा ह्यात शंका नाही.

दुसऱ्या पक्षी, तुलनात्मक आणि इतिहासनिष्ठ टीकालेखनाला पोळलेल्या बोटांच्या आठवणींनी काहीसे पछाडलेले दिसते. व्युत्पत्ती, लोकसाहित्याची सार्वत्रिकता, [संस्कृतीची] विकिरणशीलता ह्या बाबतीत आरंभी-आरंभी केलेली धाडसें, फ्रेझरपासून फ्रॉइडपर्यंतची उदाहरणें, ह्यांचा परिणाम झालेला दिसतो; फुटकळ माहिती ऐसपैस वापरली गेली आहे. ह्या वाङ्मयप्रकाराच्या लवचिकपणामुळेच बहुधा ठामपणाला आळा घालण्याला मदत झाली असावी. थोडक्यात म्हणजे, [ह्या बाबतीत] बराचसा पंडितोचित संयम आणि परस्पर सावधपणा बाळगणे इष्ट होईल.

ह्या दोहोंच्याही उलट भाषिक विश्लेषणात एक प्रकारचा बेदरकारपणा आणि पद्धतिशास्त्रसंबद्ध अस्वस्थता ह्यांचे मिश्रण दिसून येते. उदाहरणार्थ, आदिमरूपांचा (archetypes) विचार करताना त्यात एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रवास होताना आढळतो. पण माझ्या ह्या निबंधाचा मथळा लक्षात ठेवून मी आता एक कविता घेऊन तिचे जरा बारकाईने निरीक्षण करतो. मी अशी कविता घेत आहे की, तिच्या वेगवेगळ्या भागांची परस्पर समर्पकता—त्यांचे विरोध आणि त्यांची सहकार्ये—सामान्यपणे असते त्यापेक्षा अधिक लक्षात येण्याजोगी आणि वर्णन करता येण्याजोगी आहे. एखाद्या कवितेचे असणे म्हणजे काय ह्याचे एक प्रकारचे भाषिक विवेचन मी त्यामुळे करू शकेन अशी मला आशा वाटते. भाषिकच पण इतर प्रकारचीही विवेचने असू शकतील हे मी नाकारीत नाही. तसेच चरित्रनिष्ठ आणि साहित्यिक-ऐतिहासिक विवेचनेही करता येतील हे तर मुळीच नाकारीत नाही. कवीचा पत्रव्यवहार, जेवणाच्या वेळच्या त्याच्या गप्पांची संभाळून ठेवलेली टिपणे, ह्यांच्या साहाय्याने एखादा भविष्यकालीन चरित्रकार ह्या कवितेच्या संभाव्य अशा निर्मिति-प्रक्रियेसंबंधी वरवर पाहता बरीच पटणारी अशी एखादी लघुकथाही कदाचित लिहू शकेल. इथे माझा मुद्दा एवढाच आहे की, अशी लघुकथा लिहिली गेली तर ती रास्तपणे गुप्तपोलिसी कथांच्या रांगेत बसवण्याजोगी असेल.

माझ्या विवेचनाचा आरंभ म्हणून नॉर्थरॉप फ्राय ह्यांचे एक वाक्य मी घेतो. ते असे: "ज्याच्याजवळ काहीतरी सांगण्यासारखे आहे

असे कोणीतरी आपण आहो अशी थोर लेखकाची स्वतःसंबंधी सहसा समजूत नसते. आपले मन म्हणजे शब्दांच्या बाबतीत जिथे काही तरी घडते अशी एक जागा आहे असेच तो मानतो."* हे वाक्य आहे तसेच पाहिले तर चरित्रग्रंथांवरून केलेले ते एक सामान्य विधान आहे असे दिसते. पण मला वाटते बऱ्याच अंशी ती एक बोलण्याची लकब आहे. खरे म्हणजे ज्या परिस्थितीत आपल्याला फक्त कवितांसंबंधी बोलण्याचा अधिकार असतो त्या परिस्थितीत भाषा आपल्याला कवी-संबंधी बोलण्याला वारंवार प्रवृत्त करते. ह्या वाक्याचा अर्थ मला असा वाटतो की, जिथे शब्दांमध्ये परस्परव्यवहार घडून येतात अशा जागा असे समजून सुसंघटित कवितांचा अभ्यास करता येईल. विल्यम एम्प्सन्ची Legal Fiction ही कविता उदाहरणादाखल घेऊन, कवीसंबंधी अधिक विचार न करता आपण 'शब्दांबाबत काही तरी' तिच्यात कसे घडते ते पाहू.

**LEGAL FICTION †**

Law makes long spokes of the short stakes of men.
Your well fenced out real estate of mind
No high flat of the nomad citizen
Looks over, or train leaves behind.

Your rights extend under and above your claim
Without bound ; you own land in Heaven and Hell ;
Your part of earth's surface and mass the same,
Of all cosmos' volume, and all stars as well.

Your rights reach down where all owners meet, in Hell's
Pointed exclusive conclave, at earth's centre
( Your spun farm's root still on that axis dwells );
And up, through galaxies, a growing sector.

You are nomad yet ; the lighthouse beam you own
Flashes, like Lucifer, through the firmament.
Earth's axis varies ; your dark central cone
Wavers a candle's shadow, at the end.

* टरॉण्टो येथे नोव्हेम्बर २२, १९५८ रोजी केलेल्या "Humanities in a New World," ह्या त्यांच्या भाषणातून. हे 'थोर' लेखक कोण ? त्यांच्यासंबंधी आपल्याला कितपत काही कळू शकेल ? आपल्या मनासंबंधी अशी कल्पना आतापर्यंत त्यांच्यापैकी कोणाची होती ? कोणाची असण्याची शक्यता आहे ?

† *Collected Poems of William Empson* मधून. 

A-2020—8-A.

एक विषयनिर्देशक वाक्य ; आणि नंतर बाकीची कविता म्हणजे विस्तरण, एकाच वेळी वाच्यार्थाने आणि आलंकारिक अर्थाने. आपल्याला एक रेखाकृती हवी. ती आपली आपण सहज काढू शकू.



short stakes : दोन अर्थ – आपल्या हक्काच्या (claim ओळ ५) जमिनीच्या हद्दी दाखवण्यासाठी पूर्वेक्षक (prospector) जमिनीत रोवतो त्या खुंटचा, तसेच गुरांना हद्दीच्या आत आणि अतिक्रमण करणाऱ्या लोकांना हद्दीच्या बाहेर ठेवणाऱ्या कुंपणाचे खांब (spun farm ओळ ११). ह्या जमिनीसंबंधीच्या अधिकारां (rights ओळ ५) मध्ये जमिनीखालच्या आणि वरच्या सर्व वस्तूंचा अंतर्भाव होतो. जमीनमालकाचा ग्रामीण भागात हितसंबंध (stake) असतो असे मानले जाते तोही (stakes) चा इथे अर्थ आहे. त्याने पैसा, वेळ आणि श्रम आपल्या जमीन-जुमल्यात गुंतवले आहेत. तिथे त्याचे काही तरी गुंतलेले आहे (at stake).

spokes : [चाकांच्या आरा] कारण पृथ्वी स्वत:भोवती फिरते. (मी हे इतके स्पष्ट अशासाठी करीत आहे की, ज्यांची खूप भलावण करण्यात आली होती अशा वाचकांच्यासुद्धा ही गोष्ट लक्षात आली नाही असे मला अनेक वर्गांत (class-room) आढळून आले आहे).

A-2020—8-B.

real estate of mind: आलंकारिक अर्थावर भर देण्यात येत आहे. ती मनाची एक अवस्था आहे. शिवाय तो जसा जमिनीचा एक तुकडा आहे, तसाच तो मानसिक अर्जितांचा आणि विकसनांचा संचही आहे. आणि म्हणून त्याच्या खाजगीपणाला महत्त्व आहे.

No high flat: कितीही मोठ्या गगनचुंबी इमारतीच्या गच्ची-वरची खोली असो, ती ह्यावर डोकावून पाहू शकणार नाही. ह्या मालमत्तेची उंची आणि खोली अशा सर्वेक्षणाच्या अगदी पलीकडे आहे. ही कविता असेच काही तरी साधण्याचा प्रयत्न करताना दिसत असली तरी तिसऱ्या आणि चवथ्या ओळीत जे ठामपणे सांगितले आहे तेच चवथ्या कडव्यात पुन्हा पक्के केले गेले आहे, आणि तसे का ह्याचे दिग्दर्शनही केले गेले आहे. पूर्णता आणणाऱ्या क्रियेचे ते मोठे भाग आहेत.

nomad citizen: (आपल्या बागेची मशागत करणाऱ्या) शेत-कऱ्याला विरोधी म्हणून. ह्या शेतकऱ्याला आपल्या जमिनीला बांधले गेल्यासारखे वाटत असेल त्याला चवथ्या कडव्यात दिलासा दिला आहे. त्याची मालमत्ता जर अशी अमर्यादपणे इकडे-तिकडे विखुरलेली असेल तर तो अपरिहार्यपणे पुष्कळच प्रवास करीत असला पाहिजे. मात्र हा दिलासा थोडासा अस्वस्थ करणारा आहे. लूसिफर 'स्वर्गातून पतन पावला आहे', (आयझाया १४ : १२) आणि आत्म्यावर स्वत:चीच सावली पडली आहे. जो काही प्रकाश तो निर्माण करू शकतो त्यापासून तो वंचित झाला आहे.

you own land in Heaven and Hell: परंपरापरिचित स्वर्ग आणि दान्तेचा नरक (Inferno) हे दोन्ही आणि त्यांनी सूचित होणारे सर्व काही. जिच्यासंबंधी आपण विचार करीत आहो तिच्यापेक्षा वेगळा असा 'असमाप्ती'चा अर्थ कदाचित् ओळ ७ मध्ये असावा: ती ओळ एक प्रकारच्या खडबडीत, कामचलाऊ अवस्थेत असल्यासारखी दिसते. पण ९ वी ओळ पुन्हा

where all owners meet, in Hell's/Pointed exclusive conclave: ह्या शब्दांबरोबर वर चढते. conclave म्हणजे कुलुपबंद जागा; विशेषत: पोपची निवड करणारा कार्डिनल्सचा गट. (कोणत्याही

परिघाचा मार्ग नियंत्रित करणारे ह्या नात्याने) वर्तुळाच्या केन्द्राची जी भौमितिक सत्ता असते तिच्या मागे मिल्टनच्या पतित दैत्यांचे (fallen fiends) 'grand consult' असू शकेल. त्याचप्रमाणे ह्या संयुक्त मालकीचा अस्वस्थ करणारा समायिकपणाही असू शकेल – मालक होण्यासाठी द्यावी लागणारी ही फार मोठी किंमत आहे – जवळजवळ मालकी हिरावून घेणारीच.

एखाद्या कवितेतला कोणताही शब्द किंवा शब्दसमुच्चय जे कार्य करतो त्याचे, त्याच कवितेत इतर शब्द आणि शब्दसमुच्चय जे कार्य करतात त्यावरचें अवलंबन – त्यांच्या परस्पर साहाय्याचे आणि परस्पर नियंत्रणाचे प्रमाण – दाखवून देण्याचा प्रयत्न अशा प्रकारच्या भाष्याने केला पाहिजे. एखादी कविता काय असू शकेल, आणि ती केव्हा आणि कशी समाप्त होते (आणि समाप्त होते की नाही) हे ह्यावरून [परस्परावलंबनांच्या जाणिवेवरून] ठरते. कवीच्या किंवा वाचकांच्या कृती किंवा त्यांना सोसाव्या लागलेल्या वेदना, त्यांच्या इच्छा किंवा आशा किंवा प्रयत्न ह्यांवरून ठरत नाही. कविता जी समस्या निर्माण करते (किंवा शोधून काढते) ती भाषिक असते ह्याचा अर्थ असा की तिच्यातल्या घटक-शब्दांच्या परस्पर सहयोगांच्या द्वारे ती सुटते. (ती सोडवण्याचे [आणखीही] पुष्कळ प्रकार आणि मार्ग आहेत.). कोणताही एक वाचक, अर्थातच, ह्यापैकी काहींचाच आनंद उपभोगू शकतो; त्यात सहभागी होऊ शकतो. तीच गोष्ट कवींच्याही बाबतीत खरी आहे. चांगल्या कवींनी तिचा उल्लेख केला आहे. चांगली कविता जसजशी जुनी होत जाते तसतसे तिच्यातल्या शब्दांमधले हे सहयोग वाढत जातात असे दाखवून देता येईल. एखाद्या कवितेत जे घडत असते त्याचा, प्रत्यक्ष अस्तित्वात असलेल्या इतर कवितांत जे घडलेले असते त्याच्याशी किंवा इतर संभाव्य कवितांत जे घडू शकेल त्याच्याशी, कल्पनानिष्ठ (imaginative) अभ्यासात जसजसा संबंध जोडला जातो तसतशी आरंभीच्या समस्येचीच नव्हे तर तिच्यातून निघालेल्या किंवा सोडवल्या जाणाऱ्या समस्यांचीही निर्मिती (किंवा शोध) वाढत जाते. खूपच साध्या अशा एखाद्या क्रियेशी कवितेची तुलना करायची तर असे म्हणता येईल की, टेनिस खेळाडूचा खेळ दुसऱ्यांच्या खेळावर अवलंबून असतो.

कविता रचली जात असताना तिच्या वेगवेगळ्या भागांचा क्रम – काल-दृष्टया किंवा परस्पर परिणामदृष्टया – पुष्कळच बदलला जाण्याची शक्यता असते. कवीला पहिल्या प्रथम एखादा शब्दसमुच्चय सुचतो – आणि बाकीची कविता ही त्याला प्रतिसाद असते – पण मला असे वाटते की, पुष्कळदा हा आरंभी सुचलेला शब्दसमुच्चय कवितेच्या अखेरच्या खडर्यात तिच्या समाप्तीचा शब्दसमुच्चय होतो. कवितेचे वेगवेगळे भाग किती वेगवेगळ्या प्रकारांनी एकमेकांशी संगनमत करतात, एका संबंध-गटाऐवजी दुसऱ्या संबंध-गटाबद्दल अधिक अनुकूलता दाखवण्यासाठी वेगळ्या स्थान-कालसापेक्ष मांडण्या करण्याला प्रवृत्त करतात ते दाखवण्यासाठी मी माझीच – दोन पद्धतींनी मांडणी केलेली – एक कविता घेतो. गॅली-प्रूफच्या अवस्थेला पोचेपर्यंत जी मांडणी स्वीकारण्याची तिची तयारी झाली होती ती डावीकडे दिली आहे. आणि केवळ रॉबर्ट लॉवेलच्या युक्तिवादामुळे जी वेगळी मांडणी करायला मी तयार झालो ती उजवीकडे दिली आहे.

### BY THE POOL *

बोधिवृक्षाखाली ध्यानस्थ बसला असताना गौतमाने – प्रीती आणि करुणा ह्यांनी प्रेरित होऊन – काही थोड्याच लोकांना ज्याचे पालन करता येईल अशा धर्मतत्त्वाऐवजी ज्यामुळे मनुष्यमात्राचे कल्याण होईल अशा धर्मतत्त्वाचा उपदेश करण्याचे ठरवले असणे शक्य आहे.

Not beneath the Bo tree
—Its long-tongued leaves
Poplar-like a-flutter—
This Buddha sits ;
But by a limpid water
Welling by ;

Which maybe more befits
Words none will utter
9 Whoever sigh.

There search-winds of heaven
Twirl an imploring leaf,
Set the whole tree a-shiver
In glory, in grief :
Beneath, the All-giver
In pity willed
To bind up the Sheaf.

Here by his River
That tumult's stilled.

---

* आय. ए. रिचर्ड्स्च्या *The Screen and Other Poems*, © १९६० मधून Harcourt, Brace & World, Inc. आणि Routledge & Kegan Paul Ltd. ह्यांच्या परवानगीने पुनर्मुद्रित.

There search-winds of heaven
Twirl an imploring leaf,
Set the whole tree a-shiver
In glory, in grief :
Beneath, the All-giver
In pity willed
To bind up the Sheaf.

Here by his River
That tumult's stilled.

Truly inaudible
--Yet to be heard
By the ear of the mind —
The penultimate word,
Ultimate quibble :

Not ours to bind,
That way the sword ;
Who lay aside the cord
They alone find

The still figure
Beyond the flow
Listens, listened
Aeons ago.
Ever a-flutter
Must all words be.

Here is an end.

*Not ours to bind,*
*That way the sword ;*
*Who lay aside the cord*
*They alone find.*

Not beneath the Bo tree
— Its long-tongued leaves
Poplar-like a-flutter—
This Buddha sits ;
But by a limpid water
Welling by ;
Which may be more befits
Words none will utter
Whoever sigh.

Truly inaudible
— Yet to be heard
By the ear of the mind —
The penultimate word,
Ultimate quibble.

The still figure
Beyond the flow
Listens, listened
Aeons ago.
Ever a-flutter
Must all words be.

Here is an end.

हे दोन्ही पाठ असे समोरासमोर छापून मी ते माझ्या भाषणाच्या वेळी श्रोत्यांना दिले आणि त्यांना असे सांगितले की, डावीकडे छापलेला पाठ हा पहिला अपुरा खर्डा समजावा आणि उजवीकडे छापलेला पाठ हा पहिल्याची जागा घेणारा शेवटचा पक्का खर्डा समजावा. कवितेकडे अशा रीतीने पाहिल्यामुळे स्वाभाविकपणेच ती कसाला लावली गेली, आणि दुसऱ्या दिवशीं तिने पुन्हा आपले स्वातंत्र्य ठामपणे पुकारले आणि स्वतःची वेगळ्या प्रकारे मांडणी करून घेतली. काही अपवाद वगळता ती पुन्हा डावीकडे छापलेल्या पाठाकडे वळली. हे अपवाद म्हणजे

२४ ते २७ ह्या ओळी सरकून १९ व्या ओळीच्या वर गेल्या आणि २३ व्या ओळीत *quibble* च्या ऐवजी *ripple* हा शब्द आला.

आता शेवटी दोन मुद्दे :—

(१) एखादा शब्द बदलल्यामुळे इतर शब्दांमधल्या विरोध-सहयोगात खूप व्यापक बदल करावे लागले तरी कवितेची समाप्ती शब्द कमी-अधिक करण्यावर अवलंबून राहील असे नाही. कवितेच्या भागांच्या मांडणीच्या-एरव्ही पाहताना अपरिवर्तनीय वाटणाऱ्या-क्रमासंबंधीच्या प्रश्नांवर समाप्ती अवलंबून असणे शक्य आहे. तसेच एखाद्या शब्दाकडे अधिक लक्ष वेधले गेले तर इतर शब्दांच्या परस्पर-साहाय्यातही पुष्कळ बदल करावे लागणे शक्य आहे. शब्दांकडे लक्ष वेधले जाणे किंवा न जाणे, ते पुढे आणले जाणे किंवा मागे सारले जाणे (पृ. ८४ अ पाहा) ह्याचे नियंत्रण अर्थातच, कवितेचे वृत्त आणि यमक ह्यांच्याकडून मुख्यत: होते.

(२) आपल्या कवितेचे आपण काय करावे ह्यासंबंधीच्या स्वत:च्या अधिकाराबद्दल कवीला काहीही वाटत असले तरी शेवटचा अधिकार कवितेचाच असतो. आपले कर्तव्य काय आहे हे तिलाच कळते. समीक्षकाच्या भूमिकेवरून आपल्या कवितेकडे पाहताना आपल्याच ओळींचे चुकीचे वाचन करण्यात जो धोका आहे त्याकडे लेखकांनी विशेष लक्ष देणे शहाणपणाचे होईल. नॉर्थरॉप फ्राय ह्यांचेच शब्द पुन्हा वापरून सांगायचे तर एक 'अनुनयी सातत्य' ('persuasive continuity') ह्या दृष्टीने कविता ही एक वस्तू असते आणि चिकित्सक परीक्षणासाठी गोठवलेली म्हणून ती वेगळी वस्तू असते. अवलोकन आणि मूल्यमापन ह्यांसाठी कवितेला स्थिर धरून ठेवणारे वर्णनात्मक साधन-परीक्षण करणारी दृष्टी-तिच्यात सुधारणा करू शकेल आणि पुष्कळदा करतेही. त्यातून काढायचे योग्य तात्पर्य म्हणजे : **कवितेचे विवेचन करताना आपण कविताच गमावू नये.** ह्यामुळे पुष्कळशा हस्तक्षेपापासून कवितेचा बचाव होईल; पण त्याबरोबरच, चुकीच्या परीक्षणातूनसुद्धा जो प्रकाश परावर्तित होईल त्यापासून जे काही साहाय्य मिळेल त्याला ती आचवता कामा नये.

# पुरवणी

## ( भाषांतरकारांची )

गेल्या शंभर-सवाशे वर्षांत विज्ञानात जी प्रगती झाली आहे तिच्यामुळे काव्याच्या भवितव्याविषयी अनेकांच्या मनात साशंकता निर्माण झाली आहे. ह्यापुढे काव्याला काही भवितव्य आहे का ? काव्याचा उपयोग काय ? काव्याचे मानवी जीवनात महत्त्व काय ? असे प्रश्न विचारले जाऊ लागले आहेत. आणि अनेकांना असे वाटते की, जसजशी विज्ञानात प्रगती होईल तसतसे काव्याचे महत्त्व ओसरत जाईल आणि कालान्तराने काव्य नष्ट होईल. कारण निसर्गाविषयी तसेच निसर्ग आणि मानव ह्यांच्या परस्पर-संबंधाविषयी आपल्या ज्या काही श्रद्धा होत्या त्यांना विज्ञानाने प्राप्त झालेल्या ज्ञानामुळे हादरा बसला आहे. त्या श्रद्धांचे आधार नष्ट झाले आहेत आणि आपले काव्य तर पुष्कळ अंशी ह्या श्रद्धांवर, ह्या श्रद्धांतून निर्माण झालेल्या भावनांवर आधारलेले आहे. तेव्हा त्या श्रद्धाच जर नष्ट झाल्या तर त्यावर आधारलेले काव्य कसे टिकेल ?

"काव्ये आणि विज्ञाने" ह्या पुस्तकात रिचर्ड्स्ने हे प्रश्न विचारले आहेत आणि ह्या प्रश्नांची उत्तरे देताना काव्याचे स्वरूप, महत्त्व आणि कार्य काय आहे याची चर्चा केली आहे. काव्यापासून आपल्याला कोणत्या प्रकारचा अनुभव मिळतो ? त्या अनुभवाचे स्वरूप आणि महत्त्व काय असते ? आणि काही जुन्या श्रद्धांचा आधार जरी नाहिसा झालेला असला तरी निसर्गाच्या स्वरूपाविषयी आणि निसर्ग आणि मानव ह्यांच्या परस्परसंबंधाविषयी आता आपल्याला जे ज्ञान उपलब्ध झाले

आहे त्यातून आपल्याला एक नवा दृष्टिकोण लाभून त्यातून नवे काव्य निर्माण होऊ शकेल की नाही ? का होऊ नये ? असे प्रश्न विचारून त्यांची उत्तरे दिली आहेत.

आपले मन म्हणजे आस्थांचा एक समूह आहे. ह्या आस्था विविध प्रकारच्या असतात आणि कमी-अधिक महत्त्वाच्या असतात. आपला जन्मजात स्वभाव, आपल्यावर झालेले सर्व प्रकारचे संस्कार, आपल्याला वेळोवेळी आलेले अनुभव ह्यांच्या अनुषंगाने त्याचे स्वरूप घडत असते. हा आस्थांचा नुसताच समूह नसतो तर त्या आस्थांनी परस्परांशी जुळवून घेतलेले असते आणि त्यांचा एक व्यूह झालेला असतो. त्यामुळे त्यांच्यात एक तोल साधलेला असतो. काही माणसांच्या बाबतीत असा तोल साधलेला नसतो. आणि ज्यांचा साधलेला असतो त्यांचाही प्रसंगविशेषी ढळतो. पण सामान्यपणे तो साधलेला असतो. आस्थांची संख्या, त्यांचे प्रकार, त्यांच्या परस्परसंबंधातून कमी-अधिक मानाने साधलेला तोल, ह्यावर माणसाचे जीवन स्वतंत्र, विविधतापूर्ण, व्यापक आणि सार्थ होते की बद्ध, एकसुरी, संकुचित आणि व्यर्थ होते हे अवलंबून असते.

जेव्हा माणसापुढे एखादा नवा अनुभव, नवा प्रसंग, नवा विचार उभा राहतो तेव्हा त्याच्या आस्थाव्यूहात अस्वस्थता, चल-बिचल निर्माण होते. काही आस्थांना धक्का बसतो, काही उत्तेजित होतात, पण कालान्तराने तो नवा अनुभव, विचार वगैरे स्वीकारला (किंवा नाकारला) जाऊन आस्थाव्यूहाला पुन्हा एक नवा तोल प्राप्त होतो. प्रत्यक्ष आयुष्य जगताना हे सतत घडत असते.

काव्याचे वाचन हा देखील एक अनुभव आहे. मात्र तो कवीने आपल्याला घडवून दिलेला असतो. कवी जेव्हा एखाद्या अनुभवाला किंवा प्रसंगाला सामोरा जातो, किंवा एखादा प्रसंग कल्पितो आणि कविता निर्माण करतो तेव्हा तो त्या अनुभवातून–प्रसंगातून विशिष्ट घटकांची निवड करतो. अमुकच घटकांची निवड तो कां करतो हे काही अंशी त्या अनुभवातल्या घटकांवर आणि काही अंशी त्याच्या ज्या आस्था त्यावेळी जागृत झालेल्या असतील त्यांवर अवलंबून राहील. त्यांतून जी कविता निर्माण होते, तो एक वेगळा आस्थाव्यूह असतो आणि कविता वाचीत असताना आपल्याही मनात प्रतिसादरूपाने तसाच

आस्थाव्यूह निर्माण होतो. ह्या व्यूहातल्या घटक आस्था परस्परांशी अशा प्रकारे गुंफलेल्या असतात की, त्यापैकी प्रत्येकीला इष्ट तो वाव मिळालेला असतो पण कोणतीही एक आस्था दुसऱ्या आस्थेची अडवणूक करीत नाही आणि कोणतीही एक आस्था इतराहून अधिक प्रभावी होऊन आपल्याला कार्यप्रवृत्त करीत नाही. म्हणजेच त्या आस्थांमध्ये समतोल साधलेला असतो. अशा ह्या व्यूहात जितक्या अधिक आस्था जितक्या अधिक प्रमाणात गुंफल्या गेलेल्या असतील तितका तो अनुभव समृद्ध असेल. आणि तो अनुभव घेताना आपल्यालाही एक प्रकारचा समृद्धतेचा, सार्थकतेचा प्रत्यय येतो. आणि ह्या अनुभवाचा हा परिणाम केवळ काव्यवाचनाच्या वेळेपुरताच मर्यादित राहत नाही तर त्यामुळे आपल्या जीवनातल्या नित्त्याच्या आस्थाव्यूहातही एक अर्थपूर्ण बदल होतो. ह्या अर्थाने काव्यवाचनाचा अनुभव हा मूल्यवान अनुभव असतो. आणि हा अनुभव काव्यच देऊ शकते. आणि विज्ञानाने आपल्या काही जुन्या श्रद्धा स्थानभ्रष्ट केल्या असल्या तरी नव्या परिस्थितीत नव्या श्रद्धांवर आधारलेल्या आस्थांनुसार नवे काव्य निर्माण होत राहील. आणि म्हणून काव्याच्या भवितव्याविषयी निराश होण्याचे कारण नाही, असा "काव्ये आणि विज्ञाने" चा निष्कर्ष आहे.

मात्र ही सगळी प्रक्रिया सरळ किंवा सोपी नसते. तिच्यात अनेक गुंतागुंती आहेत. कविता शब्दांनी निर्माण होते आणि शब्द काही तरी अर्थ सूचित करण्यासाठी वापरलेले असतात. त्यावर अर्थ म्हणजे काय असा प्रश्न निर्माण होतो. शब्दांना दोन प्रकारचा अर्थ असतो. एक वस्तुनिर्देशात्मक आणि दुसरा भावनात्मक. वैज्ञानिक लेखनात शब्दांचा केवळ वस्तुनिर्देशात्मक वापर होतो. पण काव्यात किंवा ललित साहित्यात भावनात्मक वापर होतो. शब्दाला केवळ अनन्य असा अर्थ असतो का ? असाही प्रश्न निर्माण होतो. आपण पाहतो की, एका शब्दाला एकाहून अधिक अर्थ तर असतातच, पण एकाच अर्थाला अनेक छटा असतात. साध्या संभाषणातही आपण पाहतो की, आघात किंवा स्वर बदलला तर शब्दाचा अर्थ बदलतो. त्यामुळे वक्ता जो शब्द वापरतो त्याचा त्याला अभिप्रेत असलेला अर्थच श्रोत्याच्या मनात उमटेल असे निश्चितपणे सांगता येत नाही. श्रोत्याच्या पूर्वा-

नुभवानुसार, पूर्व संस्कारांनुसार, आकलनशक्तीनुसार त्याला त्या शब्दाच्या अर्थाचा बोध होईल. त्यामुळेच काव्यात काही वेळा संदिग्धता येते तशीच बव्हर्थता देखील येते. आणि शब्दाचा अर्थ म्हणजे शब्दाची व्याख्या असे म्हटले तर व्याख्येची बहुविधता अपरिहार्य ठरते. काव्याच्या, आणि पर्यायाने सर्वच ललित साहित्याच्या आणि कलाकृतींच्या, संदर्भात हे अनेक प्रश्न उपस्थित होतात. त्यांचा कमी-अधिक प्रमाणात निर्देश "काव्ये आणि विज्ञाने" मध्ये आलेला आहे. पण ह्यापैकी एकेका प्रश्नाचा अधिक खोल आणि अधिक सविस्तर विचार रिचर्ड्स्ने आपल्या निरनिराळ्या ग्रंथात केला आहे. त्यापैकी चार ग्रंथांच्या आधाराने त्याच्या एतद्विषयक विचारांचा स्थूल परिचय करून देणे हा ह्या पुरवणीचा उद्देश आहे. त्यामुळे "काव्ये आणि विज्ञाने" मधील त्याचे प्रतिपादन अधिक चांगले समजण्याला साहाय्य होईल अशी आशा आहे. हे त्याचे चार ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत. "द फाउण्डेशन्स ऑफ ईस्थेटिक्स", "द मीनिंग ऑफ मीनिंग", "प्रिन्सिपल्स ऑफ लिटररी क्रिटिसिझ्म" आणि "मेनशियस ऑन द माइंड".

ह्या चारही ग्रंथात कमी-अधिक प्रमाणात त्याच त्याच प्रश्नांची चर्चा असल्यामुळे पुनरुक्ति झाली आहे. तशीच पुनरुक्ति ह्या रूपरेषेत येणेही अपरिहार्य आहे. रिचर्ड्स्चे हे चारही ग्रंथ १९२२ ते १९३६ ह्या कालावधीत पहिल्यांदा प्रसिद्ध झाले. पण त्यापैकी काहींच्या आवृत्त्या नंतरच्या काळातही निघत राहिल्या. त्यावरून त्याच्या विचारांशी कोणाचे काही मतभेद असले तरी ते महत्त्वाचे मानले गेले आहेत हे दिसून येते. इथे आपल्याला त्याच्या विचारांचे खंडन-मंडन करायचे नसून केवळ ते काय आहेत हे स्थूलमानाने पाहायचे आहे.

साहित्य आणि कला ह्यांचे स्वरूप आणि त्यांची समीक्षा ह्या संबंधीचे आय. ए. रिचर्ड्स्चे विचार मुख्यत: दोन-तीन सिद्धान्तांवर आधारलेले आहेत. त्यातला सगळ्यात महत्त्वाचा सिद्धान्त शब्द, त्यांचा अर्थ आणि त्यांचा उपयोग ह्या संबंधीचा आहे. दुसरा त्यातूनच निघणारा सिद्धान्त व्याख्येच्या बहुविधतेच्या अपरिहार्यतेचा आहे. आणि तिसरा, साहित्यकृति-विशेषत: कविता-रचताना कवी काय करतो ? वाचकाच्या मनावर कवितेचा परिणाम काय होतो आणि तो कसा होतो ह्यासंबंधीचा

आहे. त्याबरोबरच कलाकृतीतील सौंदर्य म्हणजे काय ह्याचाही विचार आहे.

आधी शब्दासंबंधीचाच विचार घेऊ. जेव्हा शब्द केवळ नादानुकारी (onomatopoetic) नसतो तेव्हा त्याला त्याचा अर्थ परंपरेने किंवा संकेताने प्राप्त झालेला असतो. उदाहरणार्थ "घोडा" हा शब्द उच्चारल्यानंतर ज्या भाषेत तो शब्द आहे ती भाषा जाणणाऱ्यांना तो एका विशिष्ट प्राण्याचा निर्देशक आहे हे कळते. पण ह्याचा अर्थ "घोडा" ह्या ध्वनिसमुच्चयाचा तो स्वाभाविक अर्थ आहे असे नाही. तो त्याला रूढीने प्राप्त झालेला आहे. "एवढा घोडा वाढला आहेस, पण काडीची अक्कल नाही!" असे जेव्हा कोणी म्हणतो तेव्हा त्या वाक्यात "घोडा" ह्या शब्दाचा अर्थ एक विशिष्ट चतुष्पाद प्राणी असा नसतो, तर ज्याला उद्देशून हे विधान केलेले असते तो माणूस वयाने आणि आकाराने वाढलेला असला तरी त्याची बुद्धी व्हावी तशी प्रगल्भ झालेली नाही, हा अभिप्राय व्यक्त केलेला असतो आणि तोही अधिक्षेपाने. "घोडा" ह्या शब्दाचे कोशात आणखी अनेक अर्थ दिलेले आढळतील. तेव्हा शब्दाचा एक अर्थ वस्तु-निर्देशात्मक असतो आणि दुसरा भावनात्मक. आणि ह्या दुसऱ्या अर्थालाही दोन छटा असतात. एक भावनेचा अविष्कार करणारी आणि दुसरी भावना जागृत करणारी. जेव्हा शब्दाचा अर्थ केवळ वस्तु-निर्देशात्मक असतो तेव्हाही तो नेमका काय असतो हे नेहमीच कळत नाही. उदाहरणार्थ "घोडा" म्हटले तरी तो कोणत्या रंगाचा, आकाराचा, जातीचा, प्रदेशाचा इत्यादी गोष्टींचा बोध होत नाही. तीच गोष्ट "घर", "झाड", "टेबल" इत्यादी अनेक, किंबहुना सर्वच, शब्दांना लागू पडते. म्हणजे शब्दाच्या अर्थाला साहचर्यामुळे, स्मरणामुळे, भावनात्मक अनुबंधामुळे अनेक छटा लाभलेल्या असतात. त्यामुळे एखादा शब्द उच्चारला जातो तेव्हा वक्ता आणि श्रोता ह्यांच्या मनात त्याचा एकच (identical) अर्थ असेल असे म्हणता येत नाही. ललित साहित्यात जेव्हा शब्द वापरले जातात तेव्हा तर ते अशा अनेक छटांनी भारले गेलेले असतात.

ही झाली गोचर वस्तूंचा निर्देश करणाऱ्या शब्दांची गोष्ट. जेव्हा शब्द अगोचर म्हणजे मनोगम्य वस्तूंचे म्हणजे भाव-भावनांचे,

मन:स्थितीचे, संकल्पनांचे निर्देशक म्हणून वापरले जातात तेव्हा तर अर्थच्छटांच्या घनतेमुळे संदिग्धता आणखीच वाढते. पण त्यामुळेच ललित साहित्याला एक प्रकारची अर्थघनता, समृद्धता आणि बहुस्तरताही येते आणि सर्व–निदान अधिकात अधिक–अर्थच्छटा कळण्यासाठी वाचकाच्या मनाची विशिष्ट पात्रता असण्याची आवश्यकताही वाढते.

शब्दाच्या अर्थाला चार अंगे असतात, किंवा असे म्हणता येईल की, शब्दाचा अर्थ समजून घेताना चार गोष्टींचा विचार करावा लागतो, असे रिचर्ड्स्‌ने "द मीनिंग ऑफ मीनिंग" च्या चवथ्या प्रकरणात म्हटले आहे. ह्या चार अंगांचा उल्लेख "काव्ये आणि विज्ञाने" मध्येही त्याने केला आहे. ही चार अंगे पुढीलप्रमाणे आहेत :—

(१) उद्देश किंवा हेतु (Intention or purpose).

(२) वक्तव्यविषयासंबंधीची वक्त्याची भावना किंवा वृत्ती (Feeling or attitude towards what is being spoken about).

(३) श्रोत्यांसंबंधी वक्त्याची वृत्ती (Tone or attitude to those spoken to).

(४) वक्तव्यविषयाचा निर्देश किंवा वाच्यार्थ (Sense or reference to what is being spoken about).

ह्या चार अंगांसंबंधी लिहिताना रिचर्ड्स्‌ म्हणतो की, "संकल्पना" ह्याला आपण तूर्त शब्दाचा वाच्यार्थ म्हणू––ही संज्ञा जर आपण वरील चारांपैकी चौथ्या अंगापुरतीच मर्यादित ठेवली तर आपल्याला अनेक वेळा असे दिसून येईल की, एखाद्या परिच्छेदाविषयी चर्चा करताना आपण पहिल्या तीन अंगावरच अधिक भर देतो आणि चौथे अंग तसेच राहून जाते. पहिल्या तीन अंगांच्या चर्चेत परिच्छेदाचा सगळा अर्थ जणू संपून जातो आणि चवथे अंग जे "संकल्पना" (वाच्यार्थ) ते वक्त्याचा उद्देश आणि त्या उद्देशाच्या अनुरोधाने निर्माण झालेल्या त्याच्या वृत्ती ह्यांच्यामागे लोपून जाते.

शब्द आणि त्याचा अर्थ ह्यांच्या विचारातून ज्या समस्या निर्माण होतात त्यातला पुढला टप्पा म्हणजे "संकल्पने"ची बहुविध व्याख्या (multiple definition) करणे अपरिहार्य आहे हे मानण्याची आवश्यकता. साहित्य, कला आणि सौंदर्य ह्यासंबंधीच्या

रिचर्ड्स्च्या विचारात बहुविध व्याख्येला फार महत्त्व आहे. आणि ह्यासंबंधीचीही चर्चा त्याच्या बहुतेक ग्रंथात आली आहे. "काव्ये आणि विज्ञाने" मध्येही ह्याचा अप्रत्यक्षपणे निर्देश आला आहे.

बहुविध व्याख्येच्या आपल्या सिद्धान्तानुसार कलेचा-सौंदर्याचा-विचार करणारे रिचर्ड्स्चे पहिले पुस्तक म्हणजे "द फाउण्डेशन्स ऑफ ईस्थेटिक्स"—सौंदर्यमीमांसेची मूलतत्त्वे. सी. के. ऑग्डन आणि जेम्स वुड ह्यांच्या सहकार्याने लिहिलेले हे पुस्तक १९२२ मध्ये प्रकाशित झाले. पुढे "द मीनिंग ऑफ मीनिंग" ह्या ग्रंथाच्या सातव्या प्रकरणात ह्याच प्रश्नाचा विस्ताराने विचार करण्यात आला आहे. "द फाउण्डेशन्स ऑफ ईस्थेटिक्स" मध्ये "सौंदर्य म्हणजे काय?" किंवा "सुंदर वस्तु म्हणजे कशा प्रकारची वस्तु?" असा प्रश्न विचारून कलावंतांनी किंवा कलामीमांसकांनी त्याची जी वेगवेगळी उत्तरे वेळोवेळी दिली आहेत त्यांची यादी त्याने दिली आहे. उदाहरणार्थ "सुंदर वस्तु म्हणजे जिच्यात सौंदर्य हा गुण आहे ती", "जिला विशिष्ट घाट (form) आहे ती", "जी एखाद्या नैसर्गिक वस्तुची हुबेहूब प्रतिकृती आहे ती", "जिच्या निर्मितीत माध्यमाचा यशस्वीपणे उपयोग केला गेलेला आहे ती", "जिच्यामुळे इष्ट असे सामाजिक परिणाम घडून येतात ती", "जिच्यामुळे विशिष्ट भावना उद्दीपित होते ती", अशा वेगवेगळ्या सोळा व्याख्या त्याने दिल्या आहेत. त्यांपैकी शेवटची म्हणजे सोळावी व्याख्या आहे : "सुंदर वस्तु म्हणजे जी संवेदना-समन्वय निर्माण करू शकते ती" (which conduces to synaesthesis).

आधीच्या पंधरा व्याख्यांचे विवेचन करून त्या अपुऱ्या आणि असमाधान-कारक आहेत असे त्याने म्हटले असून शेवटली व्याख्याच कशी ग्राह्य आणि समाधानकारक आहे ते सांगितले आहे. ह्या शेवटल्या व्याख्ये-नुसार जी वस्तु—म्हणजे चित्र, कविता, इत्यादि—प्रेक्षक-वाचकाच्या मनात समतोल निर्माण करते ती वस्तु म्हणजे सुंदर वस्तु. मनाच्या ह्या अवस्थेला त्याने संवेदना-समन्वय (सिनीस्थेसिस) असे नाव दिले आहे. आपल्या मनातील प्रेरणांचा समन्वित अनुभव जेव्हा येतो त्यावेळची मनाची अवस्था म्हणजे सिनीस्थेसिस (State in which impulses

are experienced together.), आणि संवेदना-समन्वयामध्ये समतोल (equilibrium) आणि संवाद (harmony) ह्या दोहोंचाही अंतर्भाव होतो असे ह्याच कल्पनेचा विस्तार करून तो म्हणतो. त्याबरोबरच समतोल आणि संवाद ह्यांमधला फरकही त्याने दाखवला आहे. समतोलामध्ये क्रिया करण्याकडे प्रवृत्ती नसते (There is no tendency to action). परंतु प्रेरणांमध्ये जेव्हा संवाद निर्माण होतो तेव्हा त्या एकत्रितपणे कार्यान्वित होतात (When impulses are harmonized, on the other hand, they work together). आणि अशी शिस्तबद्ध क्रिया इतरत्र आवश्यकही असते. ह्याच संदर्भात त्याने कलानिर्मितीच्या वेळची निर्मात्याच्या मनाची आणि आस्वादनाच्या वेळची आस्वादकाच्या मनाची प्रक्रिया काय असते तेही सांगितले आहे.

जेव्हा कलावंत किंवा कवी एखाद्या अनुभवाला सामोरा जातो, किंवा एखादा अनुभव उभा करतो, तेव्हा तो त्या अनुभवाच्या अनेक घटकांपैकी काहींचीच आपल्या कलाकृतीच्या रचनेसाठी निवड करतो. (अनुभव हा शब्द ह्या सर्व विवेचनात मनाची कोणतीही अवस्था किंवा मनातली कोणतीही हालचाल किंवा घडामोड ह्या अर्थाने वापरला आहे). ही निवड त्याच्या आस्थांच्या हालचालींचे त्यावेळी नियंत्रण करणाऱ्या प्रेरणांनुसार होते. आणि ह्या घटकांची कलाकृतीत अशा प्रकारे रचना होते की, तिच्यात समाविष्ट झालेल्या आस्था किंवा प्रेरणांपैकी प्रत्येकीला तिच्यापुरते पूर्ण स्वातंत्र्य असते, पण कोणतीही एक आस्था-प्रेरणा इतर प्रेरणांना अडवीत नाही, किंवा इतराहून अधिक प्रभावी होऊन कोणत्याही क्रियेला प्रवृत्त करीत नाही, म्हणजेच असे की त्या कृतीतील घटकांचा आणि त्यांच्याशी निगडित असलेल्या आस्थांचा संतुलित असा व्यूह झालेला असतो. ह्याचा वर उल्लेख केलेला इथे आठवेल.

कलाकृतीचा आस्वाद घेणाऱ्या वाचक-प्रेक्षकाच्या मनात देखील प्रतिसादरूपाने तसाच संतुलित आस्थाव्यूह निर्माण होतो. आणि त्यात क्रियेकडे प्रवृत्ती नसल्यामुळे आस्वादकाच्या चित्तात एक प्रकारची तटस्थता, निरालंबता, निर्माण होते आणि त्याला आनंदाचा अनुभव

येतो. हाच सौंदर्याचा अनुभव. ज्या कलाकृतीमुळे अशी संतुलित मनोवस्था निर्माण होत नाही, आणि जिच्यामुळे क्रियेकडे प्रवृत्ति होते – म्हणजे जिथे एखादी आस्था-प्रेरणा इतरांपेक्षा अधिक प्रभावी आणि म्हणून क्रिया-प्रेरक होते – ती कृति कलाकृति नसते. आणि तिच्यापासून मिळणारा अनुभव हा सौंदर्याचा अनुभव नसतो.

कलाकृतीच्या संदर्भात रिचर्ड्‌स्‌ने मूल्यकल्पनेचाही विचार केला आहे. कलाकृतीपासून मिळणारा अनुभव हा मूल्यवान असला पाहिजे. पण मूल्यवान कशाला म्हणायचे ? कोणत्या अनुभवाला ? जो अनुभव घेत असताना किंवा घेतल्यामुळे आपल्याला समृद्ध, सार्थक, जीवन जगल्यासारखे वाटते तो अनुभव मूल्यवान. ज्या अनुभवात अधिकात अधिक आस्था अधिकात अधिक प्रमाणात समन्वित झालेल्या असतील आणि ज्यांत त्यांचेवर दर्शवल्याप्रमाणे संतुलन झालेले असेल तोच अनुभव समृद्धतेची, संपूर्णतेची, सार्थकतेने आयुष्य जगल्याची जाणीव देऊ शकेल. इतकेच नव्हे तर हा अनुभव सबंध जीवनासंबंधीच्या जाणीवेतच मोलाची भर घालतो. म्हणूनच असा अनुभव मूल्यवान असतो. "मूल्यवान म्हणजे काय?" ह्याची चर्चा "काव्ये आणि विज्ञाने" मध्येही आली असल्याचे आढळेल.

ह्यानंतरचा रिचर्ड्‌स्‌चा मोठा आणि महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे "द मीनिंग ऑफ मीनिंग". हा १९२३ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यातही सी. के. ऑग्डन त्याचा सहकारी आहे. ह्या ग्रंथात त्याने भाषेचा विचारावर पडणारा प्रभाव, तसेच शब्द, विचार आणि त्यांनी निर्दिष्ट झालेली वस्तु किंवा विषय ह्यांच्या परस्परसंबंधाची सविस्तर चर्चा केली आहे.

शब्द हे वक्त्याच्या मनात असलेल्या किंवा आलेल्या विचारांचे व्यक्त रूप असतात. शब्दाच्या साहाय्याने विचार काय आहे हे कळते. विचार हा एखाद्या वस्तुसंबंधी किंवा विषयासंबंधी असतो. मग तो विषय प्रत्यक्ष आणि मूर्त असेल किंवा अप्रत्यक्ष, अमूर्त, कल्पनाजनित असेल. शब्दांच्या द्वारा जे निर्दिष्ट होते, किंवा व्हावे अशी अपेक्षा असते, ते म्हणजे विचाराचा विषय असे म्हणता येईल. विचाराचा विषय निर्दिष्ट करणे हा शब्द वापरण्याचा हेतु असतो. पण वर उल्लेखिल्याप्रमाणे शब्द जसे वस्तुनिर्देशासाठी वापरले जातात तसे भावना व्यक्त करण्यासाठी

किंवा जागृत करण्यासाठीही वापरले जातात. तसेच वक्ता ज्या संदर्भात शब्दाचा उपयोग करीत असेल त्यावर त्याचा अर्थ अवलंबून राहील. इतकेच नव्हे तर निर्देश्य वस्तूचे त्याला जे आकलन झाले असेल त्यावर त्याचा अचूकपणा अवलंबून राहील. कधी आकलन झाले असून शब्दांनी व्यक्त करता येत नसेल किंवा श्रोत्याची बुध्दधा दिशाभूल करण्यासाठीही शब्द वापरले जातील. नव्हे जातात.

उलटपक्षी वक्त्याच्या शब्दांचा श्रोत्याला जो बोध होईल तो त्याची त्यावेळची मन:स्थिती, त्याचे पूर्वसंस्कार, त्याचे आकलनसामर्थ्य, त्याची मानसिक तयारी इत्यादींवर अवलंबून राहील. म्हणजे सर्वच शब्दव्यवहारात एक गुंतागुंत असते आणि तिच्यातूनच शब्दांच्या अर्थाची निश्चिती करण्याच्या बाबतीत अडचणी आणि संदेह निर्माण होतात.

शब्दाला स्वभावसिद्ध आणि निश्चित अर्थ असतो, त्याच्या ठिकाणी एक विशिष्ट यातुरूप (magic) शक्ती असते, अशीही समजूत परंपरेने दृढ झालेली आहे. त्यामुळे शब्दार्थाच्या निश्चितीत आणखी अडथळे येतात. ते दूर कसे करता येतील? शब्दांबद्दलचा यातुनिष्ठ दृष्टिकोण कसा काढून टाकता येईल? आणि काढून टाकणे का आवश्यक आहे? ह्याची चर्चा रिचर्ड्स्ने "द मीनिंग ऑफ मीनिंग" मध्ये केली आहे. शब्द, विचार आणि विचारविषय ह्यांचा संबंध कसा असतो हे दाखविण्यासाठी त्याने आपल्या ग्रंथात खालील आकृति दिली आहे.



शब्द (चिन्ह किंवा प्रतीक) हे विचाराचे व्यक्त रूप असते म्हणून शब्दाचा आणि विचाराचा प्रत्यक्ष संबंध असतो. विचार आणि विचार-विषय ह्यांचाही संबंध प्रत्यक्ष असतो. पण शब्द (चिन्ह किंवा प्रतीक) आणि निर्देश्य वस्तु किंवा विषय ह्यांचा संबंध मात्र अप्रत्यक्ष, संकेतसिद्ध, किंवा आरोपित असतो. म्हणून वरील आकृतीत हा संबंध तुटक रेषांनी दाखवला आहे.

जेव्हा जेव्हा आपण विचार करतो तेव्हा तेव्हा आपण शब्द, चिन्ह किंवा प्रतीक ह्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करीत असतो. आपल्याला जे सांगायचे आहे त्यात संदिग्धता राहू नये ह्यासाठी काय केले पाहिजे ह्याची चर्चा करून रिचर्ड्स्ने ह्या ग्रंथात प्रतीकव्यवहाराचे सहा सिद्धान्त (canons of symbolism) दिले आहेत. त्याबरोबरच व्याख्या म्हणजे काय? ह्याचे विवेचन करून काही संकल्पनांच्या बाबतीत व्याख्येची बहुविधता कशी अपरिहार्य आहे ते दाखवले आहे. तसेच "सौंदर्य म्हणजे काय?" ह्याचा एका स्वतंत्र प्रकरणात विचार केला असून "द फाउण्डेशन्स ऑफ ईस्थेटिक्स" मध्ये सौंदर्याच्या किंवा सुंदर वस्तूच्या ज्या सोळा व्याख्यांची सविस्तर चर्चा आली आहे त्याच व्याख्यांवर ह्या ग्रंथातही भाष्य आहे.

"प्रिन्सिपल्स ऑफ लिटररी क्रिटिसिझ्म्" हा ग्रंथ १९२४ मध्ये म्हणजे "द मीनिंग ऑफ मीनिंग" नंतर एकाच वर्षाने प्रसिद्ध झाला. साहित्य-समीक्षेच्या दृष्टीने रिचर्ड्स्चा हा ग्रंथ सर्वात महत्त्वाचा म्हणावा लागेल. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनानंतर साहित्यसमीक्षेला एक नवे वळण लागले असे मानले जाते. शब्द, शब्दांचा अर्थ, शब्दांचा उपयोग व्याख्येच्या बहुविधतेची अपरिहार्यता ह्यासंबंधी ह्यात पुन्हा चर्चा आहेच. "द मीनिंग ऑफ मीनिंग" मध्ये त्याने जे सहा canons of symbolism दिले आहेत ते त्याने ह्या ग्रंथात साहित्यविषयक, कलाविषयक आणि एकूण सौंदर्यविषयक प्रश्नांच्या चर्चेत ध्यानात घेतलेले दिसतात. कलासमीक्षेसंबंधीचे वेगवेगळे सिद्धान्त, कला आणि निवेदन, कला आणि नीति, कलेसाठी कला, कलेचा सुखवादी सिद्धान्त, लय आणि छंद, चित्रकला, शिल्पकला आणि आकृतिनिर्माण इत्यादी साहित्य-कला क्षेत्रातील बहुतेक सर्व प्रश्नांचीही ह्या ग्रंथात चर्चा आहे.

त्याशिवाय "मूल्य म्हणजे काय?" किंवा "मूल्यवान अनुभव म्हणजे कोणत्या प्रकारचा अनुभव?" ह्याचीही चर्चा या ग्रंथात वेगवेगळ्या दृष्टिकोणातून करण्यात आली आहे. आणि माणसाच्या संवेदनशीलतेच्या क्षेत्राचा विस्तार करण्याचे आणि त्याच्या मनाची संरचना बदलण्याचे कार्य कलाकृति किंवा काव्य कसे करते ते सांगितले आहे.

"मेनशियस् ऑन द माइण्ड" हा १९३२ मध्यें प्रसिद्ध झालेला ग्रंथ वेगळ्या स्वरूपाचा आहे. ह्यात मुख्यतः भाषांतरात येणाऱ्या अडचणींची चर्चा आहे. ज्या भाषेतल्या मजकुराचे भाषांतर करायचे त्या भाषेची सांस्कृतिक आणि ऐतिहासिक परंपरा ज्या भाषेत भाषांतर करायचे तिच्यापेक्षा सर्वस्वी भिन्न असेल तर भाषांतर करताना अशा अनेक अडचणी निर्माण होतात की, केव्हा केव्हा भाषांतर करणे जवळजवळ अशक्य होते. कारण काही शब्दांना किंवा संकल्पनांना प्रतिशब्दच सापडू शकत नाहीत. इथे पुन्हा शब्द, विचार आणि विचारविषय ह्यांच्या परस्परसंबंधाविषयीची समस्या सामोरी येते.

इ. पू. ३७२ ते इ. पू. २८९ ह्या कालावधीत होऊन गेलेल्या मेनशियस् नावाच्या एका नामांकित आणि कॉनफ्यूशियस्च्या खालोखाल चिनी लोकांना आदरणीय असलेल्या तत्त्ववेत्त्याच्या मनोव्यापारविषयक लेखनाच्या काही भागाचे भाषांतर करण्याचा ह्या ग्रंथात रिचर्ड्स्ने प्रयत्न केला आहे. त्यात वरील अडचणींचा उल्लेख येतो. रिचर्ड्स्ने आणखी असेही दाखवून दिले आहे की, पाश्चात्य मानसशास्त्रात मनोव्यापारांची क्रियात्मक (conative), ज्ञानात्मक (cognitive) आणि भावनात्मक (affective) अशी जी तीन अंगे परंपरेने मानलेली आहेत त्यापैकी ज्ञानात्मक अंगाला मेनशियस्च्या मानसशास्त्रात स्थानच नाही. यासंबंधी ऊहापोह करताना रिचर्ड्स्ने म्हटले आहे की, पाश्चात्य लोक आणि चिनी लोक ह्यांच्या शारीरिक क्रिया आणि मज्जातंतूंच्या क्रिया सारख्याच रीतीने होत असल्या तरी त्यांची विचारपरंपरा आणि विचारपद्धती परस्परांपासून सर्वस्वी भिन्न असणे अशक्य आहे का? विचार म्हणजे त्यात संकल्पना आणि संकल्पनासमूहही आला. आणि दोन समाजांची विचारपद्धती आणि त्यात

अनुस्यूत असलेली संकल्पनाप्रणालीच जर भिन्न असेल तर त्यांपैकी एका भाषेतल्या मजकुराचे दुसऱ्या भाषेत भाषांतर करणे अत्यंत कठीण किंवहुना अशक्य होणे अपरिहार्य आहे. * त्याच संदर्भात तो असेही म्हणतो की, पाश्चात्य जग म्हणजेच सर्व जग असे पाश्चात्य लोक समजत आले आणि अजूनही समजत आहेत हे घातक ठरण्याचा संभव आहे.

ज्ञानात्मक अंगाच्या अभावासंबंधी रिचर्ड्स् म्हणतो की, ज्ञानात्मक, क्रियात्मक आणि भावनात्मक अशी जी मनोव्यापारांची तीन अंगे आपण मानतो त्याला तरी निर्विवाद आधार काय आहे ? उलट प्रतिसादवादी मानसशास्त्राने (response psychology) ज्ञानाची (cognition) संकल्पना सगळ्यात अधिक डळमळीत करून टाकली आहे.

भाषांतरातल्या अडचणींची चर्चा करणाऱ्या ह्या ग्रंथातसुद्धा "सुंदर" (Beautiful), "ज्ञान" (knowledge), "सत्य" (truth), "व्यवस्था" (order) ह्या संकल्पनांना कशी विविध अंगे आहेत ते दाखवले आहे आणि व्याख्येचे बहुविधत्व मान्य करण्याची आवश्यकता पुन्हा प्रतिपादिली आहे.

एकूण रिचर्ड्स्चे हे महत्त्वाचे ग्रंथ पाहिले असता असे दिसून येते की, आरंभी सांगितल्याप्रमाणे त्याचा सर्व विचार काही विशिष्ट सिद्धान्तां-भोवती फिरतो. शब्द, विचार आणि विचारविषय ह्यांचे परस्पर-संबंध आणि ते निश्चित करण्यातल्या अडचणी ; शब्दांना एकच एक आणि स्वभावसिद्ध अर्थ असतो ह्या कल्पनेची अयथार्थता ; बहुविध व्याख्येची अपरिहार्यता ; शब्दव्यवहाराची चतुर्विधता, ह्या गोष्टी काव्याचा विचार करताना लक्षात घेण्याची आवश्यकता आणि सौंदर्याच्या बाबतीत मूल्य-कल्पनेचे महत्त्व. मूल्यवान अनुभव म्हणजे संतुलित अनुभव, आणि संतुलित अनुभव म्हणजे ज्या अनुभवात अधिकात अधिक आस्था-प्रेरणा अधिकात अधिक प्रमाणात अशा रीतीने व्यवस्थापित झालेल्या

*आपल्या सांस्कृतिक परंपरेतील ब्रम्ह, माया, निर्वाण, समाधी, ह्यांसारख्या किंवा नित्याच्या व्यवहारातल्या सोवळे-ओवळे, सोयेर-सुतक ह्यांसारख्या शब्दांचे इंग्रजीत भाषांतर करणे, किंवा इंग्रजीतील Trinity, Host, Mass, Salvation, प्लेटोच्या तत्त्वज्ञानातील Idea, ह्यांसारख्या शब्दांचे मराठीत भाषांतर करणे कसे कठिण असते ते आपल्याला माहीत आहे. टीप भाषांतरकाराची.

असतात की, कोणतीही एक आस्था-प्रेरणा दुसऱ्या एखाद्या आस्था-प्रेरणेला अडचण किंवा अडथळा करीत नाही, इतरांहून अधिक प्रभावी होऊन कार्याला प्रवृत्त करीत नाही, उलट सर्व लहान-मोठ्या आस्था-प्रेरणा स्वतःच्या ठिकाणी स्वतंत्र असतात आणि अशा रीतीने संपूर्णतेची, सार्थकतेची, जाणीव निर्माण करतात. असा अनुभव म्हणजेच सौंदर्यानुभव.

एका अर्थी असे म्हणता येईल की, सर्व तपशिलांसह नव्हे पण स्थूलमानाने हेच विचार "काव्ये आणि विज्ञाने" मध्ये आले आहेत.

# शब्द - सूची

## *इंग्रजी —मराठी*

Active कृतिप्रवण
Aestheticism सौंदर्यवाद
Agitation क्षोभ
Alienist मानसोपचारतज्ज्ञ
Archetype आदिमरूप
Associationist साहचर्यवादी
Attitude वृत्ती, दृष्टिकोण
Chromosome गुणसूत्र
Circuit परिपथ
Conscious सबोध
Consciousness सबोधावस्था
Crisis क्रांतिप्रसंग
Data, Datum आधारसामग्री
Dehumanization अमानुषीकरण
Design संकल्पचित्र
Discovery शोध
Dissociated असंलग्न, विलग्न
Elaborate प्रकृष्ट
Embryology गर्भवृद्धिशास्त्र
Emergent उद्गमनशील
Emotion भावना
Exploration समन्वेषण
Fact घटित
Feeling भाव
Foot खंड [साघात-निराघात शब्दावयवांच्या (Syllables) योजनेवर आधारलेला काव्यपंक्तीचा एक भाग.]

Gene जनुक
Genus वंश
Governor नियंत्रक
Heredity आनुवंश्य
Image बिंब, प्रतिमा
Imaginary काल्पनिक
Imaginative कल्पनानिष्ठ, कल्पनाप्रेरित
Impulse प्रेरणा
Inquiry शोधन
Instinct सहजप्रवृत्ती
Interest आस्था
Intuition प्रातिभ ज्ञान
Model प्रतिमान
Mood भाववृत्ती, मनःस्थिती
Morpheme प्रत्यय
Morphological शब्दसंबंधमूलक
Morphology शब्दसंबंध
Negative ऋणरूप
Neutralization अमानवीकरण
Organic सेंद्रिय, इंद्रियसंबद्ध
Organism सजीव वस्तु
Perception बोधन, बोधना
Positive धनरूप
Process प्रक्रिया, संस्करण
Pseudo व्याज

Pseudo-carp छद्मफल ( उदा. अननस, सफरचंद.)

Pseudo-pod छद्मपाद ( उदा. अमीबा )

Pseudo-statement व्याज-विधान

Rationalization पश्चात्-समर्थन

Reference विचार, ज्ञा ना श्र यी विचार.

Reverberation अनुनाद

Sanction शासनशक्ती

Sensation संवेदना

Simple निरवयव

Solar plexus सौर जालक

Species जाती

Stimulant चेतक

Stimulation चेतना

Structure संरचना

Syllable शब्दावयव

System व्यूह

Trance समाधी

Transcendental इंद्रियातीत

Transmutation परिवर्तन, रूपान्तरण.

Uniformities समरूपे

Uniformity समरूपता

Valid ग्राह्य

Viable व्यवहार्य

# शब्द - सूची

## *मराठी -- इंग्रजी*

अनुनाद Reverberation
अमानवीकरण Neutralization
अमानुषीकरण Dehumanization
आदिम रूप Archetype
आधारसामग्री Data, Datum
आनुवंश्य Heredity
आस्था Interest
इंद्रियसंबद्ध Organic
इंद्रियातीत Transcendental
उद्‌गमनशील Emergent
ऋणरूप Negative
कल्पनानिष्ठ, कल्पनाप्रेरित Imaginative
काल्पनिक Imaginary
कृतिप्रवण Active
क्रांतिप्रसंग Crisis
खंड Foot [साघात-निराघात शब्दावयवांच्या ( Syllables ) योजनेवर आधारलेला काव्यपंक्तीचा एक भाग]
गर्भवृद्धिशास्त्र Embryology
गुणसूत्र Chromosome
ग्राह्य Valid
घटित Fact
चेतक Stimulant
चेतना Stimulation
छद्‌मपाद Pseudo-pod
छद्‌मफल Pseudo-carp
जनुक Gene
जाती Species
दृष्टिकोण Attitude
धनरूप Positive
नियंत्रक Governor
निरवयव Simple
परिपथ Circuit
परिवर्तन Transmutation
पश्चात्-समर्थन Rationalization
प्रकृष्ट Elaborate
प्रक्रिया Process
प्रतिमा Image
प्रतिमान Model
प्रत्यय Morpheme
प्रातिभ ज्ञान Intuition
प्रेरणा Impulse
बिंब Image
बोधन, बोधना Perception
भाव Feeling
भावना Emotion
भाववृत्ति, मनःस्थिति Mood
मानसोपचारतज्ज्ञ Alienist
रूपान्तरण Transmutation
वंश Genus
विचार Reference
विलग्न, असंलग्न Dissociated

| | |
|---|---|
| वृत्ती | Attitude |
| व्यवहार्य | Viable |
| व्याज | Pseudo |
| व्याज-विधान | Pseudo-statement |
| व्यूह | System |
| शब्दसंबंध | Morphology |
| शब्दसंबंधमूलक | Morphological |
| शब्दावयव | Syllable |
| शासनशक्ती | Sanction |
| शोध | Discovery |
| शोधन | Inquiry |
| संकल्पचित्र | Design |
| सजीव वस्तु | Organism |
| सबोध | Conscious |
| सबोधावस्था | Consciousness |
| समन्वेषण | Exploration |
| समरूपता | Uniformity |
| समरूपे | Uniformities |
| समाधी | Trance |
| संरचना | Structure |
| संवेदना | Sensation |
| संस्करण | Process |
| सहजप्रवृत्ती | Instinct |
| साहचर्यवादी | Associationist |
| सेंद्रिय | Organic |
| सौंदर्यवाद | Aestheticism |
| सौर जालक | Solar plexus |
| क्षोभ | Agitation |
| ज्ञानाश्रयी विचार | Reference |

# विषयसूची




शासकीय मुद्रणालय, नागपूर, येथे मुद्रित.